५/९६

# इंदूर संस्थानच्या महाराणी.

# श्रीमंत अहल्याबाईसाहेब होळकर

## यांचें चरित्र.

हें

अनेक इंग्रजी व मराठी ग्रंथाधारें

गजानन चिंतामण देव

यांनीं तयार केलें.

तें मालका करितां

रामचंद्र विनायक चितळे, बुकसेलर व पब्लिशर

यांनीं छापवून प्रसिद्ध केलें.

किंमत १। रुपया.

श्रीमंत राजाधिराज,

शिवाजी महाराज होळकर सरकार

जी. सी. एस्. आय्., संस्थान इंदूर.

यांस हें पुस्तक

त्यांच्या घराण्यांतील अत्यंत थोर स्त्रीचें

शतसांवत्सरिक स्मारक

म्हणून प्रेमपूर्वक परमादरानें

पुस्तककर्त्यानें अर्पण केलें आहे.

# या पुस्तकावर अभिप्राय.

डाक्तर गणेश कृष्ण गर्दे एल्. एम्. ॲन्ड एस् व रावसाहेब नागेशराव विनायक बापट यांचा:—

श्रीमंत अहल्याबाई होळकर यांचें चरित्र रा० गजानन चिंतामण देव यांनीं लिहिलें तें आम्ही साद्यंत वाचून पाहिलें. चरित्र एकंदरींत चांगलेंच वठलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. याची भाषा शुद्ध, सरळ व सुबोध असून त्यांत ऐतिहासिक माहिती व बोधपर भाग बराच आला आहे. पहिल्या दोन तीन भागांतलें वर्णन मात्र केवळ ऐतिहासिक नसून काव्यात्मक चरित्राच्या धरतीवर गेलेलें दिसतें. इतर भागांतील वर्णन प्रायः इतिहासप्रसिद्ध गोष्टींच्या आधारावर केलेलें आहे. मुलांना आणि मुलींना वाचावयाला योग्य अशा ग्रंथामध्यें सदर चरित्राला जागा मिळण्यास तें विशेषेंकरून पात्र आहे.

पुणें,
ता० २४-७-९९.

गणेश कृष्ण गर्दे.
नागेश विनायक बापट.

# प्रस्तावना.

इंदूर संस्थानच्या महाराणी श्रीमंत अहल्याबाईसाहेब होळकर या पुण्यशील स्त्रीचें चरित्र लिहिण्याइतकी योग्यता अंगीं नसतां या पुस्तककर्त्यानें तें लिहिण्याचें साहस केलें आहे याचें कारण तिजविषयीं त्याच्या अतःकरणांत असलेली अत्युत्कट पूज्यबुद्धि होय. श्रीमंत बाजीराव बल्लाळ, नानाफडणवीस, महादजी शिंदे, महाराणी लक्ष्मीबाई यांचीं हल्लीं जशीं मराठींत स्वतंत्र चरित्रें निघालीं आहेत तसेंच या थोर स्त्रीचेंही असावें; अशी त्याची फार दिवसांपासून इच्छा होती; पण ती पूर्ण करणारा चांगल्या चरित्रकारांपैकीं अद्यापि कोणी न निघाल्यामुळें त्यास तें काम स्वतःच्याच अंगावर घेऊन तिजविषयीं दोन वेड्या वांकड्या ओळी लिहिणें प्राप्त झालें. महाराणी लक्ष्मीबाईच्या चरित्रकाराकडून जर हें चरित्र लिहिलें जातें तर तें यापेक्षां अनेक पटीनें चांगलें झालें असतें यांत संशय नाहीं. पण तें अद्यापि त्याकडून लिहिलें गेलें नाहीं व पुढेंही लिहिलें जाईल अशी आशा करितां येत नाहीं. ( कारण महाराणी लक्ष्मीबाईच्या चरित्राच्या प्रस्तावनेंत या स्त्रीची माहिती मिळत नाहीं ह्मणून जें त्यानें ह्मटलें आहे त्यावरून असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. ) यासाठीं काय होईल तें होवो आपली इच्छा तृप्त करून घेण्यासाठीं हें स्वतःच लिहावें असा त्याचा निश्चय झाला व तदनुरूप आपल्या शक्तीप्रमाणें व माहितीप्रमाणें ते त्यानें पूर्ण करून सांप्रत सूज्ञ लोकांपुढें मांडिलें आहे. आतां तें कितपत वठलें आहें हें पाहण्याचें काम सूज्ञ लोकांचें आहें.

या पुण्यशील स्त्रीविषयीं मिळावी तितकी माहिती मिळत नाहीं ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. या पुस्तकांत तिच्या पूर्व वयाची हकीगत दिली आहे तिला लेखी आधार कोठें या चरित्रकाराच्या आढळण्यांत आला नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी त्याचें महेश्वरीं जाणें झालें असतां ती हकीगत एका वृद्ध मनुष्याच्या तोंडून त्यानें ऐकलेली आहे व अशा थोर स्त्रीविषयीं कोणी खोटें सांगणार नाहीं असा त्याचा समज आहे ह्मणून ती त्यानें या चरित्रांत दिली आहे. तरी त्यासंबंधाची खरी हकीगत हें चरित्र वाचून जर कोणी त्यास कळवील तर तो त्याचा फार आभारी होईल व ती या पुस्तकाच्या द्वितीयावृत्तींत अवश्य दाखल करील. आणि तशी साधार माहिती देण्याचा सुप्रसंग यावा ह्मणून या आवृत्तीच्या त्यानें अगदींच थोड्या प्रती छापवून काढिल्या आहेत.

हें पुस्तक तयार करण्याचें कामीं डाक्टर गणेश कृष्ण गर्दे एल्. एम्. अन्ड एस् आणि रावसाहेब नागेशराव विनायक बापट या विद्वान् व थोर गृहस्थांनीं उदारबुद्धीनें जी मदत केली त्याप्रमाणेंच हें पुस्तक छापवीत असतां त्यांत दुरस्ती करण्याचें कामीं रा. रा. विष्णु दाजी गद्रे गव्हर्न्मेंट डेपोचे माजी हेड क्लार्क यांनीं जी काळजी घेतली त्याबद्दल सदरहु चरित्रलेखक त्यांचा अत्यंत आभारी आहे. तसेंच हें चरित्र लिहित असतां ज्या ग्रंथकारांच्या पुस्तकांचा त्यास उपयोग झाला त्यांचा ही तो अत्यंत आभारी आहे.

पुणें तारीख १।८।९६

पुस्तककर्ता.

# अनुक्रमणिका.

## आर्या.

श्री हरिहरभक्ता तूं देवि[1] अहल्ये वरा[2] धराभूषा[3] ॥
पूर्षा तुज साधु ह्मणे ख्याता तुज सम न बाण तनुभूषा ॥ १ ॥
देवि अहल्याबाई झालीस जगत्रयांत तूं धन्या ॥
न न्यायधर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या ॥ २ ॥
जाणे धर्म करीना त्या स्तवितो कोण पंडितंमन्या[6] ॥
न न्यायधर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या ॥ ३ ॥
धर्मार्थ गोत्रजन्या[7] किंवा झालीस तूं धराजन्या[8] ॥
तुज देवि भेटली जी सत्कीर्ति कधींच हेत राजन्यां[9] ॥ ४ ॥
न त्यजिसि नर्मदेते देवि तुझी ती बहु प्रिया आली[10] ॥
गंगेचीहि सखी हे कीं उभय मनांत सत्क्रिया आली ॥ ५ ॥
श्री विष्णुपदा स्तविली त्वद्भक्ताहे तुलाहि मानावें ॥
विश्व जिला वानितसें कां न मयूरेहि तीस वानावें ॥ ६ ॥

**मोरोपंत.**

---

१ राणी. २ श्रेष्ठ. ३ भूषण. ४ सूर्य. ५ बाणासुराची कन्या उषा. ६ आपणास मोठा विद्वान् समजतो तो. ७ पार्वती. ८ सीता. ९ राजास. १० मैत्रीण.

इंदूर संस्थानच्या महाराणी

# श्रीमंत अहल्याबाईसाहेब होळकर यांचें चरित्र.

## भाग पहिला.

### विषयप्रवेश.

---:o:---

जगदीशाच्या कृपेनें या आपल्या देशांत जे शूर, साहसी, विद्वान्, नीतिमान्, राजकारस्थानी व सदाचारी असे अनेक पुरुष अवतीर्ण झाले, त्यांच्या गुणांचें यथावद्वर्णन जसें आपण करितों तसें परकीय लोक करीत नाहींत; इतकेंच नाहीं, तर त्या पुण्यपुरुषांच्या सद्गुणांविषयीं जणुं काय त्यांच्या मनांत मत्सर उत्पन्न होऊन त्यांच्या उज्ज्वल कीर्तीस कलंक लावण्याकरितां ते गुणांऐवजीं दोषांचें हेतुपूर्वक परीक्षण करून ते प्रसिद्ध करितात व त्यांच्या ठायीं ते नच आढळले तर आपणांस वाटतील ते भलतेच दोषारोप बळेंच त्यांच्यावर लादतात. याचें प्रत्यंतर बघण्यास फारसें लांब जाणें नको. या भरतखंडांत सर्वत्र अंदाधुंदी होऊन हिंदुलोकांत हाहाकार झाला असतां, ज्यांनीं अनेक संकटें सोसून आपल्या लोकोत्तर धैर्यानें व साहसानें

पुत्र झाला व त्याचें नांव मल्हारी ठेविलें.

मल्हारी लहान असतांनाच त्याचा बाप निवर्तला; तेव्हां उदरनिर्वाहाची पंचाईत पडूं लागली; ह्मणून त्याची आई त्यासह खानदेशांत तळोदेंगांवीं तिचा भाऊ रहात होता त्याच्या घरीं येऊन राहिली. त्याची कांहीं जमीन व थोडीशीं गुरेंढोरें होतीं त्यांवर त्याचा चरितार्थ चालत असे. त्यानें आपल्या भगिनीवर आलेला आपत्काल जाणून तिला आश्रय दिला. मल्हारीचें वयास आठवें वर्ष लागल्यापासून तो आपल्या मामाचीं मेंढरें रानांत चारावयास नेत असे. त्या वेळची अशी एक गोष्ट सांगतात कीं, मल्हारी रानांत मेंढरें चरत असतां विश्रांतीसाठीं एकाद्या झाडाच्या छायेंत झोंप घेत पडे त्या वेळीं तेथें एक मोठा नाग येऊन तो त्याच्या मस्तकावर आपली फणा धरीत असे. हें त्याची जी पुढें लवकरच दैवोन्नति झाली तिचें पूर्वचिन्ह होतें.

मल्हारी हा जरी आपले मामाचे घरीं गुरें राखीत होता तरी तो लहानपणापासूनच मोठा साहसी, शूर, जिवास जीव देणारा व धन्याची आज्ञा प्राणापलीकडेही पाळणारा असा दिसे. त्याचे हे स्वाभाविक गुण त्याच्या मामाच्या लक्षांत आल्यावरून त्यानें त्यास मेंढ्या राखावयाचें काम योग्य नाहीं असें जाणून त्या वेळीं कंठाजी कदम बांडे ह्मणून कोणी सरदार सेनापति दाभाडे यांचे अंकित असून खानदेशांत रहात होते त्यांच्या येथें त्यास बारगिराची एक लहानशी जागा देवविली; आणि तेव्हांपासून मल्हारीचें मेंढ्या राखण्याचें काम सुटून, ज्यांत त्यानें पुढें चिरकालिक नांव मिळविलें त्या युद्धशाळेच्या प्रथम वर्गांत तो पाठ-

घेऊं लागला, व लवकरच आपल्या बरोबरीच्या सर्व बारगिरांवर त्यानें ताण करून सोडली.

कोणाही मनुष्याच्या अंगांत जरी मोठे अलौकिक गुण असले तरी ते उदयास येण्यास कालाची अनुकूलता व गुणग्राहक पुरुष यांचा योग आला पाहिजे. मल्हारी हा बारगीर बनला त्या वेळीं महाराष्ट्र देशाचे प्रभु सातारकर श्रीमंत शाहु छत्रपति आणि दिल्लीचा बादशहा या दोघांत लढाईची सुरुवात झाली असून शूर पुरुषांस आपल्या अंगांतील शौर्य दाखविण्यास चांगली संधि आली होती; व छत्रपतीचे सेनानी श्रीमंत बाळाजी विश्वनाथ व त्यांचे पराक्रमी पुत्र बाजीरावसाहेब पेशवे हे खऱ्या गुणांचे मोठे मार्मिक परीक्षक होते, त्यामुळें छत्रपतीची फौज बादशहाच्या फौजेशीं सामना करण्याकरितां खानदेशांतून जात असतां तींत शिरून आपलें दैव काढण्याचा योग मल्हारीस आला. तो शिलेदार होऊन आपल्या मामाच्या अनुमतानें श्रीमंतांच्या लष्कराबरोबर दिल्लीपतीशीं लढण्याकरितां गेला. नंतर बादशहाच्या फौजेशीं मराठ्यांच्या फौजेच्या ज्या कांहीं लढाया झाल्या त्यांत त्यानें आपलें पुष्कळ शौर्य व चातुर्य दाखविलें आणि श्रीमंतांस विजय मिळवून दिला. त्याच्या अंगचे अलौकिक गुण श्रीमंतांच्या लक्षांत येतांच त्यांनीं त्यास एकदम पांचशें स्वारांची मनसबदारी देऊन आपल्या पदरीं निरंतर ठेऊन घेतलें.

यानंतर कांहीं वर्षांनीं श्रीमंतांनीं माळव्यावर स्वारी केली त्या वेळीं तो प्रांत दायबहादूर ह्मणून एका शूर हिंदुसर-

दाराच्या ताब्यांत दिल्लीच्या बादशाहानें दिलेला होता. त्याशीं लढाई करून त्यास जिंकण्याचें काम श्रीमंतांनीं या वीरास सांगितलें असतां त्यानें मोठ्या पराक्रमानें धन्याच्या आज्ञेप्रमाणें त्या लढाईंत विजय संपादन करून दायबहादुरास समरांगणीं ठार मारिलें. या त्याच्या लोकोत्तर शौर्यानें व साहसानें बाजीरावसाहेबांची त्यावर सुप्रसन्न मर्जी होऊन त्यांनीं बक्षीस ह्मणून त्याच माळवाप्रांताची त्यास वंशपरंपरेनें सुभेदारी दिली. याप्रमाणें, जो केवळ मेंढ्या राखणारा मल्हारी धनगर होता तो दैवाच्या व आपल्या पराक्रमाच्या जोरावर सुभेदार मल्हारराव होळकर व पेशवे सरकारचा शूर आणि एकनिष्ठ सेवक बनला ! दैव ह्मणून ज्यास ह्मणावयाचें तें अशाच विलक्षण प्रकारचें असतें !!

दिवसानुदिवस मल्हाररावाचा सारखा अभ्युदय होत चाललेला पाहून त्याच्या मामास फार आनंद झाला, आणि त्यानें गौतमाबाई नांवाची आपली एकुलती एक कन्या त्याला अर्पण करून आपणास धन्य मानलें ! ही गौतमाबाई होळकरांच्या वराण्यांत मोठी तेजस्वी आणि धैर्यवान् अशी स्त्री होऊन गेली. आपल्या पतीचा कधीं लढाईंत पराजय होऊन त्याचा निरुत्साह झाला असतां ती त्यास वारंवार उत्तेजन देऊन पुनः लढाईला पाठवीत असे व त्यास विजय प्राप्त झाल्यावांचून स्वस्थ बसूं देत नसे. याशिवाय ती गृहप्रपंचांत मोठी दक्ष असून स्वभावानें किंचित् तापट असे. मल्हाररावाची तिजवर अत्यंत प्रीति होती. प्रथम अगदीं गरीब स्थितींत असून पुढें एका मोठ्या संस्थानाचें अधिपतित्व प्राप्त झालेल्या या दंपत्यास एकंदर तीन अपत्यें झालीं—दोन कन्या व एक पुत्र.

पुत्राचें नांव खंडेराव असून हाच आमच्या चरित्रनायिकेचा पति होय. याचें जन्म इ. स. (१७३३) यावर्षी झालें.

मल्हारराव होळकर हा प्रस्तुत चरित्राचा मुख्य विषय नसल्यामुळें त्यासंबंधानें इतकेंच लिहून आतां चरित्रनायिकेच्या वृत्तांताकडे वळतों.

---

# भाग २ रा.

———:०:———

## चरित्रनायिकेचें जन्म आणि बालपण.

जगदीश्वरसंकेतानें या मानवकोटींत जीं रत्नें पैदा होतात तीं ज्याप्रमाणें आपल्या कुलास भूषण आणितात त्याप्रमाणेंच आपल्या जन्मभूमीसही जगांत धन्यत्व आणितात; मग ती एकादें संपन्न शहर असो, पवित्र क्षेत्र असो, निर्जन अरण्य असो अथवा जेथील हवापाणी अगदीं खराब आहे असें एकादें खेडें असो; त्या मानवरत्नांच्या योगानें तिला पूज्यत्व प्राप्त होऊन इतिहासांत तिचें नांव अजरामर होतें. श्रीएकनाथमहाराजांच्या योगानें पैठण, तुकारामबुवांच्या योगानें देहू, बाळाजी विश्वनाथाच्यायोगानें श्रीवर्धन हीं त्यांच्या जन्मस्थलांचीं नांवें इतिहासास शोभा देऊन बसलीं आहेत. याचप्रकारचें श्रेष्ठत्व आमच्या चरित्रनायिकेच्या जन्मानें एका अप्रसिद्ध अशा खेड्यास आलें. हें नगरजिल्ह्यांत असून त्याचें नांव पाथरडी आहे.

सांप्रत याची स्थिति जरी एकाद्या साधारण खेड्यापलीकडे विशेष गेलेली दिसत नाहीं तरी दीडशें पावणेदोनशें वर्षांपूर्वी हल्लीच्याहून बरीच भिन्न होती. गांवासभोंवतीं लांबचलांब अशीं हिरव्यागार गवताचीं कुरणें पसरलेलीं असून त्यांत गाईंचे कळप यथेच्छ चरतांना दिसत असत. गांवांत जरी बहुतेक मराठ्यांची वस्ती होती तरी आठ दहा ब्राह्मणांचीं घरें असून श्रीमंत पेशवेसरकारचा एक ठाणेदार नेहमीं तेथें

रहात असे. बाजारपेठ प्रथम मुळींच नव्हती; पण येथून मोगलांचा मुलूख अगदीं जवळ असल्यामुळें श्रीमंतांनीं आपल्या बऱ्याच मोठ्या फौजेची छावणी येथें केली होती तिच्या योगानें थोड्याच दिवसांत बरीच वाण्याचीं आणि धान्यवाल्यांचीं दुकानें तेथें होऊन गेलीं. याशिवाय मारुती, विष्णु, शिव यांचीं चार पांच देवळें व एक लहानशी शाळा ही तेथें होती.

त्या वेळीं तेथें आनंदराव शिंदे ह्मणून कोणी धनगर आपल्या थोड्या बहुत असलेल्या शेतीभातीवर निर्वाह करून रहात असे. त्याचा स्वभाव जात्या परोपकारी असून त्यासारखीच त्याला सुदैवानें स्त्री मिळाली होती. उभयतांनीं एक विचारानें आपल्या आयुष्याचे बरेच दिवस संसारांत काढिले; पण त्यांस संतानलाभ झाला नाहीं. तथापि हें देणें केवळ परमेश्वराधीन, यास मानवी प्रयत्न व्यर्थ होत असा विचार करून आनंदराव आपल्या असल्या स्थितींत सदा समाधानी असे; परंतु त्याच्या स्त्रियेच्यासंबंधानें अगदीं उलट प्रकार होता. आपल्या बरोबरीच्या चार बायकांचीं मुलेंबाळें त्यांच्या कडेवर खेळत असलेलीं पाहून तिला तद्विषयीं असलेल्या आपल्या दैवहीनतेचा फार खेद वाटे; व ती वारंवार पतीस अपत्यप्राप्तीसाठीं कांहीं दैविक उपचार करण्याविषयीं आग्रह करी. आणि इतकेंच करून ती राहिली नाहीं, तर तत्प्राप्तीसाठीं तिला कोणी जे जे उपाय करावयास सांगितले—ह्मणजे मुंजाबाला लाख प्रदक्षिणा घालावयाच्या, जेजुरीच्या खंडोबाला तोळ्याचा सोन्याचा करगोटा करून वहावयाचा—ते सर्व तिनें करून पाहिले परंतु त्यांपासून बरेच दिवस तिचें इच्छित

पूर्ण झालें नाहीं. ती जरी अडाणी जातीची होती तरी प्रपंचाविषयीं मोठी शहाणी, स्वधर्मावर श्रद्धा ठेवणारी व पतीच्या आज्ञेंत सदा तत्पर राहणारी असे; यामुळें आनंदरावाची तिजवर अत्यंत प्रीति असून तिनें कांहीं हट्ट घेतल्यास तो पूर्ण केल्यावांचून त्याच्यानें राहवत नसे.

असें सांगतात कीं, एके दिवशीं आनंदराव कांहीं कामाकरितां आपल्या शेतीं गेला होता. दुपारची जेवणाची वेळ टळून गेली तरी तो आला नाहीं, ह्मणून ती माउली घराच्या पडवींत सारखे त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसली होती; इतक्यांत, ज्यानें लंगोटी नेसून सर्वांगास राख फांसली आहे. गळ्यांत पुष्कळशा रुद्राक्षांच्या माळा घातल्या आहेत, काखेंत भिक्षेची झोळी लोंबत आहे व ज्याच्या मस्तकाच्या ठायीं लांबलांब जटा आहेत; ज्याला तिचें दैव उघडून मनोरथ पूर्ण होण्याचा समय आला ह्मणून तिजवर अनुग्रह करण्याकरितांच केवळ परमेश्वरानें पाठविलें आहे, असा कोणी गोसावी अकस्मात् तिजसमोर प्राप्त होऊन, ' जय शंकर, माई, दोनप्रहर झाल्यामुळें भुकेनें माझे प्राण व्याकुळ झाले आहेत, यासाठीं भोजनास घालशील तर शंकर तुझे सर्व मनोरथ पूर्ण करील, असें तिला ह्मणाला. त्या साध्वीचा स्वभाव जात्या परोपकारी असल्यामुळें जरी तिचा पति जेवावयाचा होता व त्याचीच ती वाट पहात बसली होती, तरी ऐन दुपारीं क्षुधेनें पीडित झालेला अतिथि विन्मुख परत लावणें तिला फार अवघड वाटून तिनें त्याला केवळ परमेश्वर समजून पतीसाठीं जो स्वयंपाक तयार केला होता तोच त्याच्या कारणीं लावावयाचा विचार केला, व

मोठ्या आदरानें त्यास बसावयास पाट देऊन भोजनास वाढिलें; आणि तेणेंकरून तो संतुष्टझाल्यानें आपणास धन्य मानिलें.

इतर बैरागी, गोसावी, केवळ पोटाकरितां त्या वेषाचा अंगिकार करून गांवोगांव भटकत फिरतात त्याप्रमाणें तो नसून खरोखरच मोठा साधु होता. भोजन करून तृप्त झाल्यावर त्यानें बाईची सर्व हकीकत विचारून घेतली, तेव्हां ह्मातारपण होण्याचे दिवस आले तरी अद्यापि अपत्यलाभ न झाल्यामुळें तीं उभयतां फार दुःखी आहेत असें त्यास कळून आलें. नंतर कांहींसा विचार करून झोळींतून थोडासा अंगारा काढून तो तिच्या हातावर ठेवून तिला ह्मणाला, माई, " ही गोष्ट होणें न होणें केवळ परमेश्वराधीन आहे, तरी आपणाकडून तत्प्राप्तीसाठीं होईल तितका प्रयत्न करण्यांत कधीं अंतर पडूं देऊं नये. आतां मी सांगतों तें नीट लक्ष देऊन ऐक. मी आज बारा वर्षें हिंडून सर्व हिंदुस्थानांतील तीर्थें पाहिलीं त्यांत कोल्हापूरचें जगदंबेचें स्थान मोठें जागृत आहे असें मला समजून आलें. व तुला आतां प्रसाद ह्मणून जो अंगारा दिला तो तिचाच आहे; तर हा उभयतां तुह्मीं आपल्या कपाळीं लावा. व कांहीं दिवस कोल्हापुरास जाऊन जगदंबेची सेवा करा, ह्मणजे ती प्रसन्न होऊन खचित तुमचा मनोरथ सफल करील. " असें ह्मणून 'शंकरजी तुझा हेतु पूर्ण करो' असा आशिर्वाद देऊन तो निघून गेला.

गोसाव्यानें आपणास जो प्रसाद दिला तो परमेश्वरानेंच दिला असें समजून व तीच शकुनाची गांठ बांधून त्याच्या

सांगण्याप्रमाणें पतीसह कांहीं दिवस कोल्हापुरास जाऊन जगदंबेची सेवा करावयाची असा तिनें दृढ निश्चय केला व पतीसाठीं ती पुनः स्वयंपाक करण्यास लागली. कांहीं वेळानें आनंदराव शेताहून परत आल्यावर जेवावयास बसला असतां तिनें त्यास गोसाव्याच्यासंबंधानें झालेली सर्व हकीकत सांगितली. व त्यानें दिलेला जगदंबेचा अंगारा त्यास देऊन कोल्हापुरीं जाण्याचा झालेला आपला दृढ निश्चय त्यास कळविला. आनंदराव आपल्या स्त्रीप्रमाणेंच जात्या मोठा भाविक असल्यामुळें व अपत्यप्राप्तीविषयीं त्याचीही उत्कंठा अनिवार झाली असल्यामुळें तत्काळ तिच्या हेतूस त्याचें अनुमोदन मिळालें. मग उद्यांच कोल्हापुरास जावें असा त्या दोघांनीं बेत केला.

पाथरडी गांवांत एक लहानशी शाळा होती असें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ती आनंदरावाच्या घरासमोरच एक मारुतीचें देऊळ होतें त्यांत असून दहा पंधरा मराठ्यांचीं मुलें तेथें नेहमीं उजळणी शिकत असत. त्यांना शिकविणारा पंतोजी किंचित् उतार वयाचा असून उजळणी, साधारण बाळबोध मोडी वाचणें व तोंडानें बिनचूक हिशोब करणें, यापलीकडे त्याच्या विद्येची मजल गेली नव्हती; आणि तेथील मुलांना बरेच दिवसांपासून त्याचीच तो संथा देत असे व त्या वेळीं याहून अधिक शिकण्याची जरूरही नव्हती. हा पंतोजी जातीचा ब्राह्मण असून विद्वान् या संज्ञेस जरी किंचित्‌ही पात्र नव्हता, तरी तो मोठा पापभीरु, स्वकर्मनिष्ठ व ईश्वरभक्तिपरायण असल्यामुळें त्या गांवांतील सर्व लोकांवर त्याचें चांगलें वजन असे. शाळेंत सणांनिमित्त मिळणाऱ्या

शिध्याशिवाय अधिक प्राप्ति नव्हती; पण श्रीमंताकडून दरमहा आठ दहा रुपये त्याला मिळत त्यावर तो आपला चरितार्थ चालवून आनंदानें रहात असे. या पंतोजीचा व आनंदरावाचा अत्यंत स्नेह जमलेला असल्यामुळें त्याचा कोल्हापुरास देवीची सेवा करण्याकरितां जाण्याचा निश्चय झाल्यावर या आपल्या मित्रास आपण परत येईपर्यंत घरची व शेताची व्यवस्था नीट रीतीनें करावयास सांगून त्यानें सुमुहूर्तावर भार्येसह कोल्हापुरास प्रयाण केलें.

आनंदराव आणि त्याची पत्नी या दंपत्यानें कोल्हापुरास एक वर्षपर्यंत राहून जगदंबेची सेवा केली त्या योगानें ती प्रसन्न होऊन एके दिवशीं आनंदराव निद्रिस्थ असतां पहाटेच्या वेळीं स्वप्नांत प्रकट होऊन त्याला ह्मणाली कीं, तूं आज वर्षभर दृढभक्तीनें केलेल्या माझ्या सेवेनें मी संतुष्ट झालें आहें, तर आतां तूं आपल्या घरीं जा. तुझा जो इच्छित हेतु आहे तो मीच तुझ्या उदरीं येऊन पूर्ण करीन. इतकें बोलून जगदंबा अदृश्य झाली.

हें विलक्षण पण आनंददायक स्वप्न पडल्यावर आनंदराव जागा झाला व हर्षातिशयानें वेडा होत्साता लागलीच बायकोला हाक मारून व तिला सर्व स्वप्नवृत्तांत कथन करून ह्मणाला कीं, आतां आपला मनोदय खचित सफळ होणार; यावर आपणांस सेवा करण्याचें कांहीं कारण राहिलें नाहीं. मातुश्रीच्या आज्ञेप्रमाणें आतां आपण घरीं जाऊं.

त्याचें हें भाषण ऐकून त्याची स्त्री ह्मणाली, 'आपण ह्मणतां

तसेंच आतां करावयाचें. कारण, मलाही नुकतेंच असें स्वप्न पडलें कीं, जिनें आपल्या कडेवर एक तान्हुली मुलगी घेतली आहे अशी एक सुवासिनी मजपाशीं आली व माझ्या कपाळीं कुंकू लावून त्या मुलीला ओटींत घालून एकाएकीं अदृश्य झाली. मला हें स्वप्न पडतें न पडतें तोंच तुम्हांला असें पडून तुह्मी मला हांक मारिली, यावरून जगदंबा खचित आतां आपणांवर लवकरच कृपा करणार; तर उद्यां आपली सेवा पूर्ण झाली ह्मणून चार ब्राह्मणसुवासिनींना जेवावयाला घालून लागलेंच येथून निघण्याचें करूं.

यानंतर स्त्रीच्या इच्छेनुरूप आनंदरावानें आपल्या ऐपतीप्रमाणें दुसरे दिवशीं ब्राम्हणभोजन घातलें; सुवासिनींच्या खणानारळांनीं ओट्या भरल्या व जे अनाथ, आंधळे, पांगळे होते त्यांची शिधा देऊन योग्य संभावना केली; मग त्या योगानें आपणांस कृतकृत्य मानून घेणाऱ्या त्या दंपत्यानें दुसरे दिवशीं कोल्हापूर सोडून आपल्या गांवाचा रस्ता धरिला. थोडेच दिवसांत तीं उभयतां पाथरडीस स्वतःच्या घरीं येऊन पोंचल्यावर सेवा पूर्ण झाली ह्मणून त्यांनीं तेथल्या आपल्या सर्व आप्त, इष्ट मंडळीसही आपल्या घरीं भोजनाचा लाभ देऊन संतुष्ट केलें.

सकल लोकांची चिंता हरण करणारी जी कोल्हापूरची जगदंबा तिची सेवा कधीं तरी निष्फळ होईल काय? तिच्या प्रसादानें पुढें लवकरच आनंदरावाच्या स्त्रीस गर्भ राहिला. मग आनंदरावाच्या व तिच्या आनंदास काय विचारावें! केवळ जगदंबेच्या कृपेनें म्हातारपणीं आपणांस हा अपत्यलाभ

होणार असें मानून गर्भांतून त्याची निर्विघ्नपणें सुटका व्हावी म्हणून त्या दोघांनीं अनेक देवांस अनेक नवस केले व शेवटीं त्यांच्या मनोदयाप्रमाणें ते सर्व सफल होऊन नवमास पूर्ण होतांच आनंदरावाची पत्नी प्रसूत होऊन तिला मुलगी झाली.

रविवंशमुकुटमणि राजा दिलीपानें व त्याच्या स्त्रीनें नंदिनीची सेवा करून अपत्यप्राप्ति करून घेतली, तेव्हां त्या दंपत्यास जसा परमावधीचा हर्ष झाला तसाच या आमच्या आनंदरावास व त्याच्या बायकोस अनेक नवसांनीं व जगदंबेच्या सेवासायासांनीं झालेल्या कन्यालाभामुळें झाला. त्यानें लागलेंच त्या वेळीं नगरास कोणी नामांकित ज्योतिषी होता, त्याला आणवून त्याकडून आपल्या मुलीचें टिपण करविलें. ज्योतिष्यानें त्यास सांगितलें, 'तुझ्या मुलीचे ग्रह इतके उत्तम आहेत कीं, ती एका मोठ्या संस्थानिकाच्या घरांत पडून पुढें त्याच्या राज्याची स्वामिणी होईल, आणि आपल्या सद्वर्तनानें व औदार्यानें या भरतखंडांत आजपर्यंत कोणी मिळविली नाहीं अशी कीर्ति संपादन करील.' ज्योतिष्याचें हें भाषण ऐकून आनंदरावास परमानंद झाला व त्याची योग्य संभावना करून त्यानें त्यास परत घरीं जाण्यास निरोप दिला. नंतर बारा दिवस होत तोंपर्यंत जे काय विधि करावे लागतात ते सर्व करून बारावे दिवशीं मोठ्या थाटानें मुलीचें बारसें केलें, व तिचें नांव अहल्या असें ठेविलें. ही गोष्ट इसवी सन १७३६ या वर्षीं घडली.

अहल्या वर्षाची झाल्यानंतर चांगली बोलूं चालूं लागली; तिचें

रूपसौंदर्य जरी अलौकिक नव्हतें, तरी नाकाडोळ्यांनीं ती सुरेख असून बाळपणापासून तिच्या मुखावर एक प्रकारचें राजतेज पाहणारास दिसत असे. तिच्या बाळलीला पाहून तिच्या आईबापांस तिला कोठें ठेवूं आणि कोठें न ठेवूं असें झालें होतें. त्यांनीं आपल्या ऐपतीप्रमाणें पिंपळपान, हासळी, हातांतलीं चिंदलीं वगैरे दागिने तिला केले होते व ज्योतिष्याच्या सांगण्यावर त्यांचा पुरा विश्वास होता ह्मणून, ही राजकुळांतच उत्पन्न व्हावयाची असून ज्यापेक्षां आपल्या पूर्वपुण्याईनें आपल्या घरीं अवतीर्ण झाली आहे, त्यापेक्षां इला किंचितही दुःख देणें ह्मणजे तिचा अपराध करणें होय, अशी त्यांची दृढ समजूत होऊन त्यांनीं तिचें लालनपालन करण्यांत आपणाकडून कधीं कमी पडूं दिलें नाहीं.

अहल्येला पांचवें वर्ष लागल्यापासून, तिच्या ठायीं, पुढें ज्या लोकोत्तर सद्गुणांनीं तिची दिगंत कीर्ति झाली त्यांचे अंकुर थोडथोडे दिसावयास लागले. आपल्या समवयस्क शेजारच्या मैत्रिणींजवळ ती मोठ्या प्रेमानें वागत असे, व तिला कोणीं कांहीं पदार्थ खाण्याकरितां दिल्यास ती त्यांतील कांहीं भाग त्यांना दिल्याशिवाय कधीं खात नसे; तसेंच कधीं कांहीं खेळ खेळणें झाल्यास तिच्या आवडीचा मोठा खेळ ह्मणजे एकादा धोंडा मांडून त्याला देव समजून त्याची पूजा करणें हा होता. याशिवाय इतक्या लहान वयांत असतां देखील तिची सत्यावर अत्यंत प्रीति असे. ती कधीं कोणाशीं खोटें बोलत नसे व तिच्याशीं कोणीं खोटें बोलल्यास त्याच्याशीं मुळीं भाषण करीत नसे.

अहल्येच्या अंगीं असलेल्या अशा अनेक सद्गुणांमुळें

ती आपल्या आईबापांसच काय, पण त्या खेड्यांतील सर्व लहानथोर लोकांस केवळ जीव कीं प्राण होऊन राहिली. स्त्री असो, पुरुष असो, ज्याला त्याला तिला आपण आपल्याजवळ क्षणभर तरी घेऊन बसावें असें वाटत असे व त्यांच्यांत तिला घेण्याविषयीं कितीकदां भांडणें देखील होत.

मागें आनंदरावाचा मित्र तेथील शाळेचा पंतोजी ह्मणून जो सांगण्यांत आला आहे, त्याला अपत्य मुळींच नव्हतें, यामुळें त्याचा स्वाभाविक अहल्येवर कन्येप्रमाणें लोभ जडला व तो इतका वाढला कीं, तो तिला आपणापासून क्षणभरही दूर करीत नसे. त्यानें तिला लिहावयाला व वाचावयाला शिकविलें होतें, त्यामुळें अहल्येची त्यावर इतकी भक्ति जडली होती कीं, तशी प्रत्यक्ष आपल्या आईबापांवरही नव्हती. पुढें मोठेपणीं तिनें आपलें आयुष्य पोथ्यापुराणें वाचून जें सुखानें घालविलें त्याचें सर्व श्रेय या पंतोजीनें तिला जें शिक्षण दिलें त्याकडेसच येतें.

त्याला भारतरामायणांतील बहुतेक कथा माहित होत्या, त्या त्यानें सर्व तिला सांगितल्या. त्या अहल्या मोठ्या प्रेमानें ऐके. त्यांतही सीतेचा वनवास, द्रौपदीचा अज्ञातवास, तसेंच सावित्री, दमयंती, अहल्या वगैरे साध्वी स्त्रियांचा वृत्तांत यावर तिची अत्यंत प्रीति जडली असून पुनः पुनः त्या कथा सांगण्याविषयीं ती आपल्या गुरूस वारंवार आग्रह करीत असे. जणूं आपणास दुर्दैवानें पुढें याच मासल्याचा दुःखकारक प्रसंग भोगावयाचा आहे, तर त्या वेळीं धैर्यानें वागतां यावें ह्मणून बाळपणांत आपल्या पंतोजीपासून तिनें त्याचा धडाच घेऊन ठेविला होता ! असो.

याप्रमाणें आपल्या मातापितरांस, गुरूस व इतर सर्व लोकांस अंगच्या सद्गुणांनीं प्रिय झालेल्या अहल्येस आठवें वर्ष संपून नववें लागलें व त्या वेळच्या आपल्या लोकांच्या रीतीप्रमाणें ती लग्न करण्यास योग्य होऊन तिच्या बापास त्याविषयीं चिंता उत्पन्न झाली.

भाग दुसरा समाप्त.

# भाग ३ रा.

## लग्नसमारंभ.

———:o:———

ज्योतिष्यानें आनंदरावास, 'तुझी कन्या एका मोठ्या संस्थानिकाच्या घरांत पडेल' असें सांगितलें होतें व त्यावर त्याचा पूर्ण विश्वासही होता; तथापि मुलीला नववें वर्ष लागलें तरी अजून तसा कांहीं योग घडून येत नाहीं, व तिला आतां तशीच अधिक वाढविणें चांगलें नाहीं, कदाचित् त्यामुळें तिच्या अंगीं कांहीं खोड आहे असा लोक संशय घेतील, असा विचार करून आनंदराव आपल्या डोळ्यांदेखत एकादें सुस्थल पाहून लग्न करण्याच्या प्रयत्नास लागला, पण उपयोग काय ? सागराशिवाय महानदीचा योग दुसऱ्या कोणाशीं होणार ? अनेक ठिकाणीं हिंडून त्यानें पुष्कळ स्थळें पाहिलीं. पण त्याच्या मनाजोगतें एकही त्यास आढळून येईना. अखेरीस ज्यानें कृपाळु होऊन या कन्येस आपल्या उदरीं घातलें तो परमेश्वर तिला योग्य स्थळ देऊन आपली चिंता नाहींशी केल्यावांचून राहाणार नाहीं अशा विश्वासावर त्याला समाधान मानून राहाणें भाग पडलें.

जगांत ज्या कांहीं विलक्षण गोष्टी घडून येतात त्या कशा घडल्या याचा आपण विचार करूं लागलों असतां त्यास जितका वेळ लागेल तितका त्या घडून येण्यास देखील लागत

नाहीं. मात्र त्या कोणी घडवून आणूं ह्मटल्यानें घडणें नाहींत. आपल्या मुलीला एकादें सुस्थल पाहण्याविषयीं प्रयत्न करून आनंदराव थकला, पण तिच्यासंबंधानें ज्योतिष्यानें केलेलें भविष्य खरें होण्याचा व त्याची काळजी नाहींशी होण्याचा प्रसंग निराळ्याच प्रकारानें अवचित् घडून आला. सुभेदार मल्हारराव होळकर यांस खंडेराव या नांवाचा एकुलता एक मुलगा होता, असें मागें सांगण्यांत आलें आहेच. तो या वेळीं चांगला वयांत आला असून आपल्या पित्याच्या मराठ्यांचें राज्य वाढविण्याच्या अंगीकृत कार्यास हातभार लावण्यासारखा झाला होता. तो शरीरानें चांगला सुदृढ असून शिकार खेळण्याचा त्यास फार शोक असे, व अनेक वेळां श्रीमंत शाहूमहाराजांबरोबर अरण्यांत जाऊन तेथें रानडुकरांची शिकार करून खुद्द छत्रपतींकडून त्यानें आपली वाहवा करून घेतली होती. याशिवाय साधारण लिहणें, वाचणें, तालीम करणें, वगैरे त्या वेळीं सर्व मराठे सरदारांच्या अंगीं जे गुण अवश्य असावे लागत ते सर्व त्यानें संपादन केले होते.

आपल्या मुलाच्या अंगांत असलेले गुण पाहून व छत्रपतीकडून त्याची वाहवा झालेली ऐकून मल्हारराव व त्याची स्त्री गौतमाबाई यांस फार आनंद होत असे व त्यावर ते प्राणापलीकडे प्रेम करीत असत. खंडेराव आतां लग्नाला योग्य झाला आहे यासाठीं त्याचें एकाद्या कुलीन व सुशील मुलीबरोबर लग्न करून टाकावें, ह्मणून गौतमाबाईनें मल्हाररावांस सांगितलें व त्यांचाही त्याचप्रमाणें बेत झाला. तथापि त्यांचा वरपक्ष असल्यामुळें त्याविषयीं त्यांना विशेषशी काळजी करावी लागली नाहीं. एक दोन वेळां खंडेरावास मुली सांगून आल्या होत्या, पण त्या वेळीं ते

धन्याच्या महत्कार्यांत गुंतून गेल्यामुळें ह्मणा, अथवा खंडेरावाच्या नशीबीं त्यास एका अलौकिक स्त्रीची प्राप्ती व्हावयाची असल्यामुळें ह्मणा, इतका वेळपर्यंत त्यांस प्रिय पुत्राचें लग्न करितां आलें नाहीं.

या वेळीं श्रीमंत नानासाहेब पेशवे यांची कारकीर्द नुकतीच सुरू झालेली असून त्यांच्या वडिलांच्या आकस्मिक मरणानें उत्तर हिंदुस्थानांत चाललेलें लढाईचें काम अर्धेंच तहकूब झाल्यामुळें त्यांच्या शत्रूंना बराच जोर येऊन ते पेशव्यांचा गुजराथ व माळवा या प्रांतांत असलेला अंमल झुगारून देण्याच्या प्रयत्नास लागले होते. त्यांचा बंदोबस्त करून देशांत शांतता करण्याकरितां श्रीमंतांनीं आपले बंधु रघुनाथरावदादासाहेब पेशवे यांस, त्यांच्या मदतीस मल्हारराव होळकर व इतर सरदार आपआपल्या सैन्यांसह देऊन पाठविलें होतें व त्यांच्या आज्ञेप्रमाणें ते लवकरच तिकडचा सर्व बंदोबस्त करून व मोठा विजय संपादन करून श्रीमंतांच्या भेटीकरितां पुण्यास येण्यास निघाले होते.

पाथरडीगांवांत श्रीमंतांच्या सैन्याची छावणी होती असें मागें सांगण्यांत आलेंच आहे. श्रीमंतांची स्वारी कधीं उत्तरहिंदुस्थानांतून आली ह्मणजे तिचा मुक्काम बहुतकरून या ठिकाणीं झाल्याखेरीज राहात नसे. त्याप्रमाणें विजयश्री संपादन करून दादासाहेबांची स्वारी आपल्या सर्व सरदारांसह पुण्यास चालली असतां भरदोनप्रहरचे वेळीं पाथरडीच्या मुक्कामास आली. आनंदरावाच्या घरासमोरचें मारुतीचें देऊळ बरेंच मोठें असून कोणी सरकारी कामगार व खुद्द श्रीमंत पेशवे यांचें

येथें कधीं येणें झाल्यास त्यांची खासगी बैठक याच मारुतीच्या देवालयांत होत असे व त्यांचा मुक्काम तेथें असे तोंपर्यंत अर्थात् त्यांत असलेल्या शाळेंतील मुलांस सुट्टी मिळत असे. असो.

आतां आमच्या चरित्रनायिकेच्या लग्नाचा योग कसा घडून आला तो पहा. श्रीमंत रघुनाथरावदादासाहेबांबरोबर मल्हारराव होळकर हे असून खंडेरावही त्यांच्या बरोबरच होता. सैन्याची वगैरे सर्व व्यवस्था लावून भोजनास अवकाश होता ह्मणून देवळाच्या सभामंडपांत बैठक टाकून सर्व सरदार मंडळी इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी बोलत बसली होती. तेथील शाळेचा पंतोजी हा आपल्या सर्व शिष्यांस सुट्टी देऊन श्रीमंतांच्या जवळ बसून त्यांच्या ह्मणण्यास मान डोलवीत होता. इतक्यांत, ज्याच्या सुशिक्षणामुळें व विशेष लडिवाळपणामुळें जिला त्यावांचून घटकाभर देखील दूर राहावत नसे अशी आमची अहल्या त्या ठिकाणीं कांहीं निमित्तानें येऊन आपल्या पंतोजीजवळ बसली. जणूं काय तिच्या भाग्योदयानेंच तिला पुढें घालून या वेळीं तेथें आणिली !

छानदार मुखचर्या ही मुकी शिफारस होय, असें कोणीं ह्मटलें आहे तें खरें आहे. ती बघतांक्षणींच त्या मनुष्याविषयीं बघणाराच्या मनांत प्रेम उत्पन्न होतें. आमच्या अहल्येचा चेहरा जरी कवींनीं आपल्या ग्रंथांत वर्णन केलेल्या रूपवतींच्या चेहऱ्यांप्रमाणें सर्वांशीं सुंदर नव्हता तरी त्यावर जें एक प्रकारचें नैसर्गिक राजतेज परमेश्वरानें ठेविलेलें झळकत होतें तें पाहून तिजविषयीं कोणाच्याही मनांत तत्काल प्रेमभाव उत्पन्न झाल्यावांचू राहात नसे. यामुळें तिला बघतांक्षणींच श्रीमंत दादासाहेबांच्या, मल्हाररावांच्या

व इतर सरदारांच्या मनांत तिजविषयीं एकदम प्रेम उद्भवलें. नंतर तिच्या शिक्षकास त्यांनीं तिजविषयींची हकीकत विचारिली असतां त्यानें ती मूळापासून सर्व त्यांस निवेदन केली व ती ऐकून सुभेदारांस फार आनंद झाला, व आपल्या खंडेरावास हीच बायको योग्य आहे असा त्यांचा विचार होऊन तो त्यांनीं दादासाहेबांस सांगितला व त्यांनाही तो पसंत पडला.

मग लागलीच त्या शिक्षकास पाठवून त्यांनीं आनंदरावास बोलावून आणिलें व त्यास आपला मनोदय कळवून त्याचें मत काय आहे तें विचारिलें. तेव्हां त्यास परमानंद होऊन तो श्रीमंतांस ह्मणाला, 'मी सरकारचा यःकश्चित्, एक चाकर आहें, सुभेदारांसारख्यांचा व्याही होण्याची माझी योग्यता नाहीं, असें असतां माझी मुलगी आपली सून करण्याविषयीं त्यांस इच्छा उत्पन्न झाली ही केवळ परमेश्वराची कृपा अथवा माझ्या मुलीचें भाग्य होय.'

या त्याच्या ह्मणण्यावर दादासाहेब सुभेदारांस ह्मणाले, 'मुलीच्या बापाची संमति तर मिळाली. आतां खुद्द खंडेरावाचें काय मत आहे तें लागलेंच विचारून घ्या.' असें ह्मणून त्यांनीं हास्ययुक्त मुद्रेनें खंडेरावाकडे पाहिलें असतां तो आपल्या मनांत अहल्येला पाहून उत्पन्न झालेला आनंद किंचित् दाबून त्यांस मोठ्या नम्रतेनें ह्मणाला, 'दादासाहेब, यांत माझें पोराचें तें काय मत घ्यावयाचें आहे? वडील माझ्या अकल्याणाची गोष्ट कधीं करणार नाहींत, तेव्हां ते जें करतील तें मला मान्य असलेंच पाहिजे. हें खंडेरावाचें भाषण ऐकून दादासाहेब, मल्हारराव व इतर सर्व मंडळी या सर्वांस आनंद झाला. नंतर दादा-

साहेब सुभेदारांस पुनः बोलले कीं, आतां कोणतीही हरकत राहिली नाहीं. मग त्यांनीं खंडेराव व अहल्या यांस आपल्या जवळ बसवून त्यांचा जोडा कसा शोभतो तें पाहिलें, व त्या योगानें समाधान पावून सुभेदारांस ह्मणाले ‘ आह्मांस तर हा अहल्याखंडेरावाचा जोडा पाहून फार आनंद झाला आहे, तर आतांच्या आतां लग्नतिथी नेमून साखरपुडा होऊं द्या !

ज्या कार्यास प्रत्यक्ष श्रीमंतांचें अनुमोदन मिळालें तें होण्यास कितीसा अवकाश लागणार आहे ? लागलीच त्यांच्या जवळ निरंतर असणाऱ्या दोघां विद्वान् ब्राह्मणांनीं अहल्येची पत्रिका पाहून सुभेदारांस सांगितलें कीं, ही मुलगी पुढें मोठी कीर्तिवान् होणार आहे. इचे ग्रह इतके उंचे आहेत कीं, तिजबरोबर लग्न करणारा वर मोठा भाग्यशालीच असला पाहिजे व त्याप्रमाणें आपले चिरंजीव आहेतच. ह्मणून हा जोडा मोठ्या आनंदानें व सुखानें राहील. ’ नंतर जवळचें पंचांग काढून त्यांस लाभणारी जवळची लग्नतिथी कोणती ती त्यांनीं सुभेदारांस सांगितली.

नंतर सुभेदार आनंदरावास ह्मणाले, ‘झालें. आतां कांहीं एक पहावयाचें उरलें नाहीं. तुमची अहल्या आह्मांस पसंत पडली व याच ठरलेल्या तिथीस या उभयतांचें लग्न पुणेंमुक्कामीं करावयाचें, तर तुह्मी आतांपासून सर्व तयारी करून पुण्यास या, हें त्यांचें भाषण आनंदरावानें आपणास मान्य आहे असें दाखविल्यावर लागलाच सुभेदारांनीं लग्न ठरल्यानिमित्त साखरपुडा अहल्येला देऊन तिजसह आनंदरावास घरीं जाण्यास परवानगी दिली.

अहल्येची जन्मपत्रिका कांहीं आमच्या पाहण्यांत आली नाहीं; तथापि खंडेरावाचें तिच्याशीं लग्न ठरतांना ज्या ब्राह्मणांनीं ती पाहिली ते मूर्ख होते अथवा तिचें लग्न झाल्यावर जो पुढें थोड्याच दिवसांनीं तिजवर वैधव्यदुःखाचा प्रसंग आला ह्मणून तिच्या जन्मपत्रिकेंत तिचे असलेले अनिष्टग्रह त्यांस माहीत असून ते त्यांनीं सांगितले नाहींत, असा आह्मी त्यांस दोष देत नाहीं. यावर वाचकांचें समाधान होण्याकरितां आह्मी इतकेंच सांगतों कीं, श्रीरामचंद्रास राज्यावर बसण्यास वसिष्ठानें काढिलेल्या मुहूर्तावर त्यास वनवासास जावें लागलें ह्मणून त्याबद्दल कोणी वसिष्ठास दोष देईल काय ? तर हा सारा देवापेक्षांही एका मात्रेनें अधिक असणाऱ्या दैवाचाच प्रभाव होय! पण याविषयीं इतक्यांतच विशेष वाटाघाट कशास पाहिजे ? अजून अहल्येचें लग्न होणें आहे.

श्रीमंतांनीं निरोप दिल्यावर ज्योतिष्याचें वचन खरें झालें ह्मणून हर्षभरित होत्साता आनंदराव आपल्या प्रिय कन्येसह घरीं येऊन त्यानें झालेला सर्व प्रकार आपल्या पत्नीस कळविला. त्या वेळीं तो ऐकून तिला झालेला आनंद किती वर्णावा ! त्याच्या भरांत ती नवऱ्यास ह्मणाली कीं, ' माझी अहल्या प्रत्यक्ष कोल्हापुरची जगदंबा आहे ! तेव्हां ती अशाच ठिकाणीं पडली पाहिजे ! ! ' यानंतर आणखीं आनंदरावानें तिला सांगितलें कीं, मुहूर्त येत्या मार्गशीर्ष महिन्यांत ह्मणजे आणखीं एक महिन्याच्याच अवकाशानें धरिला आहे, तर तोंपर्यंत आपणास लग्नाची सर्व तयारी करून पुण्यास गेलें पाहिजे.

आनंदराव अगदीं साधारण स्थितींतला मनुष्य होता, तरी

त्यांचे स्नेहीसोबती पुष्कळ होते; आणि अहल्या ही त्याला एकुलती एकच कन्या असल्यामुळें व तिचा विवाह एका मोठ्या संस्थानच्या अधिपतीच्या पुत्राशीं होणार असल्यामुळें या वेळीं त्या सर्वांस सकुटुंब आपल्या घरीं बोलवावयाचें असा त्याचा निश्चय होऊन तो त्यानें आपल्या स्त्रियेस सांगितला व त्याला तिचें लागलेंच अनुमोदन मिळालें. मग त्यानें आपला मित्र जो तेथील पंतोजी त्याच्या मदतीनें लवकरच सर्व तयारी केली व लग्नतिथीच्या अगोदर पंधरा दिवस पुण्यास येऊन राहिला.

आनंदराव गरीब होता ह्मणून त्याची सर्व तयारी लवकर आटपली. पण इकडे सुभेदारसाहेबांकडे अगदीं उलट प्रकार होता. ते संस्थानिक असल्यामुळें त्यांना आपल्या ऐश्वर्याप्रमाणें सर्व तयारी करावयाची होती; व या समारंभास हिंदुस्थानांतील लहान मोठे राजे जे त्यांचे मित्र झाले होते त्या सर्वांस बोलाविलें पाहिजे होतें. तरी तत्संबंधी सर्व तयारी त्यांचें येणें पाथरडीहून पुण्यास झाल्यानंतर त्यांनीं दोघां इसमांकडून लवकरच करविली.

मल्हाररावांस सुभेदारीचा अधिकार दिला त्याच वेळेस त्यांच्या दिवाणगिरीची जागा श्रीमंतांनीं गंगाधर यशवंत नांवाच्या एका हुषार ब्राह्मणास दिली होती. त्यावर सुभेदारांचा पूर्ण विश्वास असे. या वेळीं लग्नासंबंधीं सामान आणणें, आलेल्या वऱ्हाडी मंडळींची सर्व प्रकारची व्यवस्था लावणें, लग्नसमारंभाकरितां भव्य मंडप घालणें व त्यासाठीं वाटेल तितका खर्च करणें ही सर्व व्यवस्था दिवाण गंगाधर यशवंत याच्या गळ्यांत सुभेदारसाहेबांनीं घातली व त्यानेंही त्यांच्या आज्ञेप्रमाणें ती उत्तम रीतीनें बजाविली.

मल्हारराव होळकरांचा पुतण्या तुकोजी ह्मणून कोणी होता तो त्यांच्याप्रमाणेंच रणशूर व वडिलांची आज्ञा पाळण्याविषयीं सदा तत्पर असल्यामुळें त्यास त्यांनीं आपल्या पदरीं बाळगिलें होतें; व त्याच्या अंगच्या योग्यतेप्रमाणें त्यास आपल्या खासपागेचा सर्व अधिकार दिला होता. ( हाच तुकोजी पुढें मल्हाररावांचा निर्वंश झाल्यावर होळकरांच्या गादीचा वारस होणार होता. ) त्यास दुसरी सर्व व्यवस्था–ह्मणजे आपले सर्व नातेवाईक, स्नेही व लहानमोठे राजेरजवाडे यांस लग्नाकरितां निमंत्रण करावयास जाऊन घेऊन यावयाचें व ते आल्यावर त्यांच्या अधिकाराप्रमाणें त्यांची योग्य व्यवस्था लावून त्यांत कांहीं कमी पडूं द्यावयाचें नाहीं—ही सांगून आपण स्वस्थ राहिले. तुकोजीनें वडिलांची आज्ञा शिरसा मान्य करून लागलीच सर्व आप्तांची, स्नेहीमंडळीची व राजेरजवाड्यांची नांवनिशीवार यादी करून त्यांना निमंत्रण करण्याकरितां गमन केलें.

सुभेदारसाहेबांचा स्वभाव मोठा उदार असल्यामुळें त्यांच्याकडून कोणत्या ना कोणत्यातरी रीतीनें हिंदुस्थानांतील लहानमोठ्या सर्व संस्थानिकांवर व त्यांच्या सर्व आप्तांवर उपकार झाले होते; ह्मणून त्यांच्या उपयोगीं पडण्याचा प्रसंग येईल तितका बरा अशी प्रत्येकाच्या अंतःकरणांत इच्छा होई, व तसा आल्यास जो तो आपणास धन्य मानी; यामुळें तुकोजीरावाच्या मार्फत मल्हाररावांच्या घरचें बोलावणें पोंचल्यावर लग्नसमारंभास आठ दिवस अवकाश आहे तोंच सर्व राजेरजवाडे व त्यांचे सोयरेधायरे आपआपल्या परिवारासह पुण्यास आले. व त्या योगानें सर्व शहर गजबजून गेलें.

निमंत्रण केलेले सर्व लोक आले; पण या समारंभास आपले धनी श्रीमंत शाहू छत्रपति आले नाहींत व त्यांच्यावांचून केलेल्या समारंभाची पूर्तता व्हावयाची नाहीं असें सुभेदारांना वाटून ते स्वतः साताऱ्यास गेले व महाराजांस लग्नास येण्याविषयीं त्यांनीं विनंति केली.

आपल्या गादीचा एकनिष्ठ सेवक असून राज्याची वृद्धि करण्याकरितां ज्यानें अनेकविध संकटें भोगिलीं त्या मल्हाररावाची विनंति छत्रपतींस कशी अमान्य होणार ? ते त्याच्या हेतूप्रमाणें लागलेंच सपरिवार पुण्यास येऊन दाखल झाले.

यानंतर ठरलेल्या लग्नतिथीला खंडेराव आणि अहल्या यांचा विवाह मोठ्या थाटानें झाला. आनंदराव जरी गरीब होता, तरी त्यानें रीतीप्रमाणें सर्व शिष्टाचार करण्यास कमी केलें नाहीं. आणखी असें सांगतात कीं, त्या आनंदाच्या भरांत त्यानें आपलें सर्वस्व ब्राह्मणांस दान केले ! ! मल्हाररावांच्या पुत्राचें लग्न असल्यामुळें ठिकठिकाणाहून पुष्कळ विद्वान् ब्राह्मण आले होते, त्या सर्वांस त्यांनीं योग्य दक्षिणा देऊन संतुष्ट केलें.

लग्नसमारंभास जे राजेरजवाडे व मल्हाररावांचे नातेवाईक जमले होते, त्या सर्वांनीं त्यांना आपापल्या ऐश्वर्याप्रमाणें व ऐपतीप्रमाणें अहेर केले. अहल्येचा चेहरा विधात्यानें असा कांहीं बनविला होता कीं, त्याकडे पाहतांच बघणाराच्या मनांत तिजविषयीं कन्यावात्सल्य उत्पन्न व्हावें ! सर्व राजेरजवाड्यांनीं मोठमोठे दागिने तिच्या अंगावर घातले. मग अहल्येचा—अथवा आतां तिला नुसतें

अहल्या कसें ह्मणावें ? ती अहल्याबाई होळकरीण झाली---थाट काय विचारावा ! मस्तकावरील, गळ्यांतील, हातांतील व पायांतील सर्व अलंकार घातल्यामुळें ती प्रत्यक्ष एकाद्या देवतेप्रमाणेंच दिसूं लागली. वरातीच्या वेळीं खंडेरावानें डोक्याला भरजरी पगडी घातली होती व त्याच्या अंगांत जरीचा अंगरखा असून पायांत तुमानही त्याच प्रकारची होती. हातांत कडींतोडे व गळ्यांत मौल्यवान् हिऱ्यांची कंठी शोभत होती ! खंडेराव व अहल्याबाई यांची वरात मोठ्या थाटानें सर्व शहरभर मिरविल्यानंतर गंगाधर यशवंत यानें घातलेल्या भव्य मंडपासंनिध येऊन थडकली !

या वेळीं मंडपांत जी विलक्षण शोभा दिसून येत होती तिचें वर्णन किती करावें ? मंडपाच्या मध्यभागीं श्रीमंत शाहू छत्रपति एका उच्च सिंहासनावर विराजमान झाले असून त्यांच्याजवळ त्यांचे मुख्यप्रधान श्रीमंत नानासाहेब पेशवे बसले होते, व डाव्याउजव्या दोन्ही अंगांस निमंत्रणावरून लग्नसमारंभास आलेले सर्व राजेरजवाडे आपापल्या योग्यतेप्रमाणें बसले होते. मंडपांत अनेक प्रकारच्या रंगारंगांच्या हंड्या आणि झुंबरें लाविलीं असून त्यांचा प्रकाश शांत व नेत्रांस आनंददायक असा पडला होता. हिंदुस्थानांतल्या नामांकित कलावतिणींचे ताफे नृत्यगायन करण्याकरितां उभे होते. सोनेरी वर्खांच्या विड्यांचीं व सुवासिक पुष्पांच्या हारगजऱ्यांचीं ताटें तसेंच अत्तरदाणी व गुलाबदाणी हातांत घेऊन अनेक माणसें ते देण्याच्या ईषाऱ्याची वाट पहात होते.

नवरानवरीची वरांत सर्व शहरभर मिरवून मंडपापाशीं आलेली कळल्यावर श्रीमंत छत्रपतींनीं त्या नूतन विवाहित दंपत्यास

आपणाजवळ आणण्यास सांगितल्यावरून लागलेंच मल्हाररावांनीं खंडेराव व अहल्याबाई यांस आणून छत्रपतींच्या पायांवर घातलें. नंतर त्यांनीं त्या दोघांस मोठ्या प्रेमानें आपल्या मांडीवर बसवून व समयोचित त्यांची किंचित् थट्टा करून त्यांच्या तोंडांत साखर घातली. याचें नांव दैव ! नाहीं तर कोण खंडेराव ! धनगराचा मुलगा ! कोठें तरी मेंढ्या राखीत रानांतून हिंडावयाचा व तशीच अहल्या त्याच्या पाठोपाठ भटकावयाची ! पण सुदैवाच्या बळानें ती छत्रपतींच्या मांडीवर बसण्यास योग्य झाली ! असो. छत्रपतींनीं प्रारंभ केल्यावर इतर सर्व मानकऱ्यांनीं त्याचप्रमाणें करून त्या जोडप्यास पुढील मंगलविधीकरितां उपाध्याबरोबर लग्नगृहांत पाठविलें.

यानंतर तुकोजी होळकरांनें सर्वांस विडे, हारगजरे वगैरे दिल्यावर प्रहरभर कलावंतीणींचें मनोहर नृत्यगायन होऊन छत्रपती व त्यांच्या मागून सर्व राजेरजवाडे मंडपांतून निघून गेले. नंतर मल्हाररावांनीं कलावंतिणींना योग्य बक्षिसें देऊन त्यांची संभावना केली.

दुसरे दिवशीं लग्नसमारंभ आटपल्यावर सुभेदारांनीं आपल्या सर्व नातेवाईकांस व राजेरजवाड्यांस मोठी टोलेजंग मेजवानी दिली व नंतर त्यांस जाण्यास निरोप दिला. मल्हाररावांचें कुलदैवत जेजुरीचा खंडोबा होय. लग्न झाल्यावर त्यांनीं आपल्या पुत्रास व स्नुषेस खंडोबाच्या दर्शनास नेऊन परत आणिलें व नंतर लवकरच श्रीमंतांची आज्ञा घेऊन माळवा प्रांतांतील आपली राजधानी जी इंदूर तेथें प्रयाण केलें.

ज्योतिष्यानें भविष्य केल्याप्रमाणें अहल्या संस्थानिकाच्या घ-

रांत पडून तो लग्नसमारंभ तर आटपला, व तेणेंकरून आनंदरावाचे व त्याच्या स्त्रीचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. आतां या भागाच्या शेवटीं इतकेंच सांगावयाचें राहिलें आहे कीं, अहल्येचें लग्न झाल्यावर तिच्या आईबापांनीं लवकरच इहलोकची यात्रा आटपली ! अहल्येची पुढें जी कीर्ति झाली ती ऐकण्यास त्यांस परमेश्वरानें जिवंत ठेविलें नाहीं, त्यानें त्यांवर मोठी कृपाच केली असें ह्मटलें पाहिजे; नाहीं तर पुढें आपल्या प्रियकन्येवर आलेले एकामागून एक दुःखाचे प्रसंग ऐकून त्यांपेक्षां त्यांस मरणच प्रिय झालें असतें ! निदान आपल्या दुःखमय स्थितींत त्यांचें दुःख पाहून अहल्येला तरी तसें वाटलें असतें !

भाग तिसरा समाप्त.

# भाग ४ था.

## संसारसुख.

———:०:———

एकाद्या भयाण निर्जन प्रदेशांतून कोणास प्रवास करण्याचा निरुपायानें प्रसंग आल्यास तो त्यांतून मार्गक्रमण करीत असतां दुर्दैवानें ठिकठिकाणीं त्यास सूर्याच्या उष्णतेनें तप्त झालेलीं वाकूचीं मैदानें लागावीं व तेणेंकरून प्रवास कष्टतर होऊन त्यानें बारंवार दुःखानें कपाळावर हात मारून पुढें पाऊल टाकीत असावें, अशा वेळीं अवचित ज्यावर विस्तीर्ण आम्रवृक्षाची गर्द छाया पडली आहे असा एकादा जलाशय त्याच्या दृष्टीस पडल्यास कितीही घाईचें कार्य असलें तरी तो त्या ठिकाणीं क्षणभर जाऊन विश्रांति घेतल्याशिवाय राहत नाहीं, त्याप्रमाणेंच आमच्या चरित्रनायिकेच्या चरित्रांतील हा भाग वाचकांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. अहल्याबाईचें लग्न झाल्यापासून पुढें दहा वर्षांचा काल लोटेपर्यंत—ह्मणजे जोंपर्यंत तिचा पति जिवंत होता तोंपर्यंत—जे तिच्या आयुष्याचे दिवस गेले तेच काय ते पूर्ण सुखाचे होत. त्यानंतरचा सर्व काल तिजवर दुर्दैवानें एकामागून एक आलेलीं दुःखें सोसण्यांत तिला कंठावा लागला! त्यांचें यथातथ्य वर्णन पुढें जसजसें हें चरित्र वाचकांच्या वाचण्यांत येईल तसतसें आमच्या वरील लेखाची सत्यता त्यांस कळून येईल. असो.

अहल्याबाईचें लग्न झाल्यावर तिच्या पूर्वींच्या व सांप्रतच्या स्थि-

तींत जमीनअस्मानाचें अंतर पडलें. ममताळू आईबापांशीं लडिवाळपणानें वागावयाचे दिवस जाऊन आतां सासूसासऱ्यांच्या आज्ञेंत राहावयाचा प्रसंग आला; बालपणच्या माहेरच्या मैत्रिणी टाकून आतां नणंदांशीं सहवास प्राप्त झाला; एकादी गोष्ट करणें न करणें हें तिच्या मनाच्या स्वाधीन न राहतां नवऱ्याच्या मर्जीवर अवलंबून राहिलें; आणि सांप्रत तिला जें मोठें ऐश्वर्य प्राप्त झालें त्याला शोभेल असें आपलें वर्तन ठेवणें भाग पडलें.

गरीब असो वा श्रीमंत असो. प्रत्येक कुलीन कन्यकेला हे सर्व अथवा यांतील कांहीं तरी योगायोग येतातच. पण त्यांतून उत्तम रीतीनें पार पडून सर्वांकडून वाहवा ह्मणवून घेण्याचें व उभय कुलांस भूषण आणण्याचें फारच थोड्यांच्या हातून घडतें; व तें जिच्या हातून घडतें तीच खरी कुलवती होय. आमच्या चरित्रनायिकेनें वरील सर्व कामें उत्तम रीतीनें बजावून सर्वांकडून आपली वाहवा करून घेतली !

तिचा सासरा मल्हारराव होळकर याची पूर्वींपासूनच तिजवर प्रीति होती, व ती तिनें त्याची उत्तम प्रकारें सेवा करून आपणावर इतकी जडवून घेतली कीं, त्यास अहल्या ही आपल्या घरांतील सर्व माणसांत अधिक आवडती होऊन बसली. शिवाय अहल्येची पूर्वपुण्याईच अशी कांहीं जबर होती कीं, तिची वाणी कधीं असत्य होऊंच नये ! मल्हारराव कधीं लढाईवर जावयास निघाले ह्मणजे ते या आपल्या प्रिय स्नुषेला विचारून जात, व तिनें ‘ तुह्मांस या लढाईंत जय मिळणार ’ असें ह्मटलें कीं, तो हटकून मिळावयाचाच; यामुळें सुभेदारसाहेबांस आपल्या घरांत ही मूर्तिमंत विजयश्रीच अहल्येच्या

रूपानें येऊन राहिली आहे असें वांटून त्यानें तिजवर प्राणापलीकडे प्रेम ठेविल्यास त्यांत नवल कसलें ?

तिची सासू गौतमाबाई ही गृहप्रपंचांत मोठी शहाणी होती; तथापि तिचा स्वभाव थोडासा तापट असे, असें मागें सांगण्यांत आलेंच आहे. हा तिचा स्वभाव अहल्याबाईच्या लक्षांत तिचें लग्न झाल्यापासूनच आलेला होता ह्मणून मोठ्या सावधगिरीनें ती तिजशीं वर्तन ठेवीत असे. तिला राग येईल अशी कोणतीही कृति तिनें कधीं केली नाहीं, व एकाद्या गोष्टींत आपलाच हेका धरून तिचें मन कधीं दुखविलें नाहीं. तिच्या मर्जीप्रमाणें तिची सेवा करून व तिच्या अंगांत जे उत्तम गुण होते ते सर्व संपादन करून नेहमीं तिच्या मुखांतून आपल्या कल्याणाचे तिनें आशीर्वाद मिळविले. लहान वयांत अशी गोष्ट करून घेण्यास केवढें शहाणपण व किती चातुर्य अंगांत असलें पाहिजे बरें ?

सुभेदारसाहेबांच्या दोघी मुली हरकुबाई व उदाबाई यांची लग्नें खंडेरावाच्या अगोदरच झालीं होतीं. त्या कधीं माहेरीं आल्यास अहल्याबाई त्यांच्याशीं मोठ्या प्रेमानें वागत असे व वडील बहिणीप्रमाणें त्या दोघींना मान देत असे; यामुळें त्यांना आपली भावजय अहल्या ही केवळ जिवलग मैत्रीण होऊन राहिली होती. शिवाय अहल्येनें आपणास येत असलेलें लिहणेंवाचणें त्यांना शिकवून रिकामपणीं ज्ञानसंपादनांत वेळ घालविण्याचा मार्ग दाखवून दिला होता ह्मणून त्यांनीं तिला आपल्या नणंदेच्या अधिकारानें एक चकार शब्द बोलून देखील कधीं दुखविलें नाहीं. असें अकृत्रिम प्रेम फारच थोड्या नणंदाभावजयांत असेल यांत संशय नाहीं.

अहल्याबाईच्या सेवेला अनेक दासदासी होत्या, तरी तिनें कधीं त्यांना विशेष त्रास देऊन अथवा ऐश्वर्याच्या मदानें दुरुत्तरें बोलून आपणाविषयीं त्यांच्या मनांत अप्रियता उत्पन्न होऊं दिली नाहीं. सर्वकाळ त्यांच्याशीं ममतेनें वागून त्यांना तिनें इतकें आपलेंसें करून टाकिलें होतें कीं, ' आमची धनीन अहल्याबाई हिला परमेश्वर शंभर वर्षें आयुष्य देवो व ती आमचा प्रतिपाल करो ' असे त्यांच्या मुखांतून नेहमीं उद्गार निघत असत; व त्या योगानें जितकें तिच्या मनांस समाधान वाटत असे तितकें अनेक प्रकारचे मौल्यवान् अलंकार अंगावर घालून व पुष्कळ राज्यैश्वर्य भोगूनही वाटत नसे.

देवाविषयीं तिच्या अंतःकरणांत पूर्ण भक्ति पूर्वीपासूनच उद्भवली होती ती पुढें मोठ्या ऐश्वर्यांत पडल्यावरही किंचित् कमी झाली नाहीं. ती आपला सकाळचा सर्व वेळ तुळशीला प्रदक्षिणा घालण्यांत व बाळकृष्णाची पूजा करण्यांत घालवीत असे. या तिच्या विशेष देवभोळेपणाबद्दल तिचे सासूसासरे तिची नेहमीं थट्टा करीत व कधींकधीं तर तिला रागेंही भरत असत; तथापि तिनें आपला नित्यक्रम कधीं सोडिला नाहीं.

आपल्या लोकांत मुलीला ऋतुप्राप्त होईपर्यंत तिचा पतीशीं कोणत्याही प्रकारें विशेष संबंध घडून येत नाहीं त्याप्रमाणेंच अहल्याबाईची सासरीं पांच वर्षें लोटून तिला ऋतुप्राप्त होईपर्यंत तिचा व खंडेरावाचा कधीं भाषणाचादेखील प्रसंग आला नव्हता; तथापि आपल्या स्त्रीच्या अंगीं असलेल्या अलौलिक सद्गुणांची आईबापांकडून व इतर सेवकजनांकडून नित्य होत असलेली वाखाणणी ऐकून त्यास फार धन्यता वाटे व परमे-

श्वरानें असें स्त्रीरत्न आपणास दिल्याबद्दल तो निरंतर त्याचे आभार मानी.

याप्रमाणें सासुसासऱ्यास, पतीस, व सर्व सेवकजनांस आपल्या आचरणानें आनंद देत असतां व आपण आनंदानें राहात असतां पतिपत्नींचा संयोग करून देणारा परमेश्वराच्या वरचा वकीलच कीं काय असा आमच्या चरित्रनायिकेस ऋतु प्राप्त झाला व त्या योगानें सुभेदारादि सर्व मंडळीस आनंद होऊन त्यांनीं राजेलोकांच्या रीतीप्रमाणें तो समारंभ मोठ्या थाटानें केला.

समारंभाच्या दिवशीं रात्रीं, ज्यावर विविधोपभोगद्रव्यांनीं युक्त अशी उत्तम शय्या घातली आहे असा हस्तिदंती छप्परपलंग एका शृंगारलेल्या ऐनेमहालांत मांडिला होता, व त्यांत अनेक सुगंधितैलाचे दीप प्रकाशित केले होते अशा सुखस्थलीं खंडेराव व अहल्याबाई यांची प्रथम ओळख झाली. त्या वेळीं त्या चतुर आणि सुज्ञ अशा राजविलासी दंपत्याची बहुत वेळपर्यंत अनेक प्रकारचीं मनोरंजक संभाषणें झालीं असलीं पाहिजेत; पण तीं दुसऱ्या कोणास थोडींच कळणार आहेत ? या आनंदप्रद प्रसंगाचें इतकेंच वर्णन आमच्या वाचकांस देण्याचें आमचे हातीं आहे, व चरित्रकारास याहून जास्ती देतां येतही नाहीं मुख्य विषयाकडे दुर्लक्ष करून उगीच एकाद्या कादंबरीग्रंथाप्रमाणें स्वकपोलकल्पित शृंगारिक वर्णन देऊन आम्ही प्रिय वाचकांचें मनोरंजन करूं इच्छित नाहीं.

आतां अहल्याबाईचें आपल्या पतीशीं वर्तन कसें होतें

तें पहा. लग्नापूर्वीं आपल्या पंतोजीकडून सीता, द्रौपदी, दमयंती वगैरे साध्वीस्त्रियांचीं चरित्रें, जीं तिनें ऐकून अंतःकरणाशीं घट्ट धरून ठेविलीं होतीं, त्यांच्याच अनुरोधानें तिनें त्याच्याशीं आचरण ठेवून आपणास सुखी मानिलें. पति हा केवळ आपलें दैवत आहे असें मानून कायेनें, वाचेनें, व मनानें त्याच्या आज्ञेचा भंग करण्यास ती साध्वी कधीं प्रवृत्त झाली नाहीं. खंडेरावास शिकारीचा फार शोक असे व ती करण्याकरितां तो नित्य सकाळींच उठून जंगलांत जाई, तो दोन प्रहर होत तोंपर्यंत परत येत नसे; पण अहल्याबाईनें तो येऊन त्याचें जेवण झाल्याशिवाय कधीं भोजन तर काय पण पाण्याचें आचमनदेखील घेतलें नाहीं. याहून आणखीं पातिव्रत्य विशेष तें कोणतें राहिलें ? आणि अशा शुद्ध प्रेमानें व धर्माचरणानें ज्याची स्त्री वागते आहे त्यास सतत आनंद आणि सुख यांची प्राप्ति झाल्यास त्यांत अधिक तें काय झालें ? अशा स्त्रीची योग्य परीक्षा करून तिला निरंतर संतोषित ठेवण्यास जो पति तनमनधनेंकरून झटतो तोच या जगांत धन्यता मिळवितो, व त्यावरच परमेश्वर पूर्ण कृपा करितो ! खंडेरावानें ह्या दोन्ही संपादन केल्या. आपल्या स्त्रीच्या स्वभावाची योग्य परीक्षा करून त्यानें तिजशीं प्रेमाचरण ठेविलें व आमरण एका कठिण शब्दानेंदेखील तिचें मन दुखविलें नाहीं.

या सुशील दंपत्याचें परस्परांवर अधिक प्रेम करण्यांत दिवस चालले असतां दोन वर्षांनंतर अहल्याबाई गरोदर होऊन पुत्र झाला, त्याचें नांव मालीराव ठेविलें. त्यावर खंडेराव व अहल्याबाई यांची अत्यंत प्रीति असे. पतीचें कधीं

लढाईवर जाणें झाल्यास त्यामुळें होणाऱ्या वियोगदुःखाचे दिवस ती साध्वी या पुत्राच्या मुखाकडें पाहून समाधानानें चालवीत असे.

यानंतर आणखी तीन वर्षांनीं अहल्याबाईला एक कन्या झाली जिचें नांव मुक्ताबाई असें होतें. अहल्याबाईप्रमाणेंच ती स्वरूपानें असून पुढें स्वभावानेंही तशीच निपजली. ती कशी ती सर्व हकीकत याच चरित्रांत योग्य प्रसंगीं वाचकांस आढळून येईल.

याप्रमाणें सासूसासऱ्यांचा स्वतःच्या मुलाप्रमाणें लोभ, पतीची अत्यंत प्रीति, सेवकजनांची खरी निष्ठा, पुत्र आणि कन्या यांचें लालनपालन करण्यांत मनास होत असलेला नित्यानंद, आणि अपरिमित राजैश्वर्य, यांतील एकेक गोष्ट प्राप्त होण्यास मोठी पुण्याई लागते व तिचा लाभ झाल्यास होणाराचे दिवस मोठ्या सुखानें जातात. आमच्या अहल्याबाईस तर हीं सारीं सुखें प्राप्त झालीं होतीं. मग तिचे संसारांतले दिवस आनंदानें कां न जावे? विचार करून पाहिलें असतां तिच्या सारखें सुख क्वचितच दुसऱ्या कोणत्याही स्त्रीला मिळालें असेल.

पण असे सुखाचे दिवस सर्व आयुष्यभर ठेवण्याचा देवाचा —अथवा दैवाचा ह्मणा—हेतु नसतो. त्याच्या कृपेनें ते प्राप्त झाले तरी फारच थोडे असतात, व ते क्षणासारखे भरकन् निघून जातात. हें खरें का खोटें याचा अनुभव प्रत्येकास आहेच. त्याचप्रमाणें आमच्या चरित्रनायिकेच्या वृत्तांताची स्थिति झालेली आहे. लहानपणीं मातापितरांच्या प्रेमांत लडिवाळपणानें दिवस काढिले व तरुणपणाचे कांहीं दिवस पतीच्या सुखकर समागमांत

आनंदानें दवडिले; पण आतां मात्र तें सर्व वारें फिरून पर्वताप्रमाणें दुःसह दुःख सहन करण्याचा व वारंवार आलेल्या भयंकर संकटांस धैर्यानें पाठ देऊन व स्वतःच्या शहाणपणानें त्यांचें निवारण करून भवितव्यतेशीं झगडण्याचा प्रसंग साध्वी अहल्या-बाईवर तिच्या दुर्दैवानें आणिला; तो कोंणता, कसा आला व त्याचा परिणाम काय झाला हा सर्व वृत्तांत या आनंदाच्या भागांत न आणतां पुढल्या भागावर टाकितों.

भाग चवथा समाप्त.

# भाग ५ वा.

## पतिवियोग.

मनुष्यप्राणी कितीही श्रीमान्, धैर्यवान्, शूर, राजकारस्थानीं व सदाचारी असो, आणि अनेक संकटांतून त्यानें आपणास चातुर्यानें पार पाडिलेलें असो, एकदा या विश्वभक्षक कालाची धाड त्यावर येऊन पडली ह्मणजे तेथें त्याच्या कोणत्याही गुणाची मात्रा चालत नाहीं; निमूटपणें त्या कालचक्राच्या फेऱ्यास मान देऊन इहलोकची यात्रा संपविणें त्यास भाग पडतें! हा सृष्टिनियम लक्षांत आणिला ह्मणजे आमच्या चरित्रनायिकेच्या पतीचा जो आकस्मिक अंत झाला त्याबद्दल वाचकांस होणारें दुःख विचारानें आवरतां येईल.

इ. स. १७५४ या वर्षास नुकताच आरंभ झाला होता. हा काल ह्मटला ह्मणजे आपणा महाराष्ट्रीयांच्या वैभवमंदिराचा कळस होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्या वेळीं पेशवाईचीं सूत्रें ज्यांच्या हातीं होतीं त्या श्रीमंत नानासाहेबांनीं बहुतेक सर्व भरतखंड स्वतःच्या अमलाखालीं आणिलें होतें. पोर्तुगीज, निजाम वगैरे बलिष्ट शत्रूंची रग जिरवून त्यांस हतवीर्य करून सोडिलें होतें. दिल्लीपतीस आपल्या अगदीं मुठींत ठेविलें होतें व रजपुतान्यांतल्या शूर हिंदुभूपतींस आपले मांडलिक करून

टाकिलें होतें. शिंदे, होळकर, वगैरे रणधुरंधर त्यांचे आज्ञांकित होते. शिवाय जवळ पुष्कळ फौज असून खजिना भरलेला होता. सारांश त्यांस कोणत्याही गोष्टीची न्यूनता ह्मणून राहिली नव्हती.

अशा वेळीं सर्व फौज रिकामी बसून खर्च खात पडली आहे हें बरें नव्हे, ह्मणून तीस उत्तरहिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांपासून खंडणी वसूल करण्यास पाठवावें असा श्रीमंतांनीं विचार करून आपले बंधु रघुनाथरावदादासाहेब यांस साठ हजार सैन्य बरोबर देऊन मुलुखगिरीवर रवाना केलें, व शिंदे, होळकर वगैरे आपल्या शूर व एकनिष्ठ सेवकांना त्यांच्या बरोबर जाण्यासाठीं हिंदुस्थानांत त्यांस मिळण्याविषयीं आज्ञापत्रें लिहिलीं.

श्रीरामचंद्राची आज्ञा मान्य करण्यास मारुती जसा एकापायावर तयार असे त्याप्रमाणें आपले धनी श्रीमंत पेशवे यांचा हुकूम पाळण्यास तत्पर असणाऱ्या सुभेदारांनीं आज्ञापत्र वाचतांक्षणींच सैन्यासह दादासाहेबांस जाऊन मिळण्याची तयारी केली, व ही मोहिम केवळ खंडणी वसूल करण्याकरतांच असल्यामुळें व हींत रक्तपात विशेष होण्याची भीति नसल्यामुळें त्यांनीं आपले चिरंजीव खंडेराव होळकर यांस आणि कुटुंबांतील सर्व बायकामाणसांस बरोबर घेतलें होतें. थोड्याच दिवसांत दादासाहेब फौजेसुद्धां नर्मदा उतरतात तोंच त्यांस सुभेदार येऊन मिळाले व श्रीमंतांच्या आज्ञेप्रमाणें दुसरेही सरदार येऊन दाखल झाले.

तदनंतर ही जंगी मोहिम क्रमाक्रमानें हिंदुस्थानांतील राजे-

रजवाड्यांकडून पाहुणचार घेत व खंडणी वसूल करीत चालली. सुभेदारांनीं आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळी बरोबर घेतली होती ह्मणून वर सांगितलेंच आहे. तींत अहल्याबाई ही होतीच. तिची या वेळीं सर्व संस्थानिकांच्या कुटुंबांतील स्त्रियांशीं ओळख झाली. या साध्वीच्या सद्गुणांची सर्वत्र होत असलेली वाहवा त्या संस्थानिकांच्या स्त्रियांनीं पूर्वींच ऐकिली होती, व तेव्हांपासून एकवार अशा सुशील स्त्रीशीं आपला चार दिवस सहवास घडावा अशी प्रत्येकीला इच्छा झाली होती; तो योग या वेळीं अनायासें घडून आल्यामुळें त्यांनीं अहल्याबाईचें योग्य स्वागत करून तिजशीं मित्रत्व जोडिलें व आपल्या घरीं चारदोन दिवस तिला राहवून घेऊन तिच्या समागमाचा लाभ मिळाल्यामुळें आपणांस धन्य मानिलें !

असो. अशाप्रकारें श्रीमंत दादासाहेब फौजेनिशीं उत्तरेस भरतपुर ह्मणून जाट लोकांचें प्रबळ संस्थान होतें त्याच्या सांनिध प्राप्त झाले व त्यांनीं तेथील राजा सुरजमल्ल यास खंडणी देण्याविषयीं नाहींतर युद्ध करण्याविषयीं निरोप पाठविला.

सुरजमल्ल हा चांगला फौजबंद होता व त्याच्या जवळचे सरदार मोठे लढवय्ये होते; तथापि श्रीमंतांचें सामर्थ्य तो जाणत असल्यामुळें लढाई करण्याचें त्याच्या मनांत येईना. त्यानें वकिलाबरोबर, चाळीस लक्ष रुपये खंडणी देतो, असें श्रीमंतांस सांगून पाठविलें; पण तें त्यांस मान्य न होऊन त्यांनीं एक कोट रुपये खंडणी मागितली. सुरजमल्ल इतकी रक्कम देण्यास कबूल होईना; तेव्हां त्याच्याशीं लढाई करण्याचा दादासाहेबांनीं बेत

करून आपल्या सैन्याचा तळ जवळ कुंभेरी ह्मणून एक गांव आहे तेथें दिला, व तेथील किल्ल्यास मोर्चे लाविले. इकडे सुरजमल्लानेंही आपल्या सर्व फौजेची चांगली तयारी करून किल्ल्याचें रक्षण करण्याकरितां तिची रवानगी केली. याप्रमाणें तयारी होतांच दोन्ही पक्षांतील लोकांनीं लढाईस प्रारंभ करून एकमेकांवर गोळागोळीचा मारा सुरू केला!

मनुष्य एक चिंतितें, पण होणाऱ्या गोष्टी कांहीं निराळ्याच असतात. व त्या कितीही मानवी प्रयत्नानें टळल्या जात नाहींत हें उघडच आहे. सर्वच गोष्टी जर मानवी प्रयत्नानें टळतील, तर मग मनुष्यांत आणि परमेश्वरांत भेद तो काय राहिला? या मोहिमेंत सहसा लढाईचा प्रसंग येणार नाहीं असें सुभेदारांना वाटून त्यांनीं आपलें सर्व कुटुंब बरोबर घेतलें होतें खरें; पण ईश्वरी नेमानेम कांहीं निराळाच होता. होळकरांच्या राज्याचा पुढें होणारा अधिपति या मोहिमेंत पतन पावून सुभेदारांच्या कुटुंबांत हाहाकार व्हावयाचा होता, तो परमेश्वरसत्तेनें व आमच्या नायिकेच्या दुर्दैवानें घडून आला यास कोणाचा काय उपाय?

जाटांशीं मराठ्यांची लढाई सारखी दीड महिना चालली होती; हे मोर्चे लावून किल्ल्यावर नेहमीं हल्ला करीत होते; व शत्रूकडचे लोक यांच्याशीं टक्कर देऊन आपलें रक्षण करीत होते. अशांत एके दिवशीं दुपारचें भोजन वगैरे आटपल्यावर सुभेदारांचे चिरंजीव व आमच्या चरित्रनायिकेचे पति मोर्चांत पेशव्यांचें जें निशाण लाविलेलें होतें तेथें सहज जाऊन युद्धचमत्कार पहात उभे होते, इतक्यांत साध्वी अहल्याबाईच्या

सौभाग्यमंदिराचा नाश करणारा विद्युल्लतेचा गोळाच काय, अथवा तिचा प्राण हरण करणारा प्रत्यक्ष कृतांतच काय, असा एक तोफेचा गोळा मोठ्या वेगानें सूंसूं करीत शत्रूंच्या सैन्यांतून अकस्मात् येऊन खंडेरावांच्या अंगावर धाडदिशीं पडला! मग काय, तोफेचा गोळाच तो! त्याच्या तडाक्यांत सांपडल्यावर मोठमोठ्या पर्वतांच्या कड्यांचा देखील सहज चूर होतो; तर मनुष्यप्राण्याचा कसा बचाव होणार ! खंडेरावांस तो लागतांक्षणींच ते एकदम धाडकन् जमीनीवर पडले. या वेळीं त्यांचें अंग भाजून निघालें होतें. इतक्यांत सेवकांनीं हा अनर्थ घडलेला पाहून लागलेंच त्यांना उचलून छावणींत आणिलें व लवकरच तेथें सर्व सरदारलोक जमून त्यांनीं औषधोपचार करण्यास सुरुवात केली. पण भवितव्यतेशीं झगडून काय उपयोग ! त्या गोळ्याचा वज्रप्राय मारा दुःसह होऊन आमच्या चरित्रनायिकेच्या सौख्याचा जणूं काय गाभाच अशा खंडेरावमहाराजांचा अंत झाला. ! !

शिवशिव ! या इहलोकची वसती किती अशाश्वत आणि अनिश्चित आहे! आपल्या सर्व महत्वाकांक्षा व त्या सफल होण्याकरितां योजलेल्या मसलती, तसेंच आपलें ऐश्वर्य, आपला मोठा अधिकार, आपल्यावर प्रेम करणारे आईबाप व इतर मित्र, आणखीं आपल्या सुखदुःखाची वांटेकरीण होणारी स्त्री, या सर्वांचा एकदम त्याग करून जाणें भाग पडावें ह्मणजे त्या बिचाऱ्या प्राण्याला किती वाईट वाटत असेल! पण तसें वाटून काय उपयोग ! तें टाळण्याचें थोडेंच परमेश्वरानें आपल्या हातीं ठेविलें आहे!

ज्या पुत्रास आपण जन्म दिला, व लालनपालन करून

लहानाचें मोठें केलें; व ज्यास सुशिक्षित करून इहलोकी कीर्ति संपादण्याचा मार्ग दाखवून दिला;ज्याचें उत्तम गुणवती स्त्रीशीं लग्न करून उभयतांचा संसार सुखावह होईल अशी योजना केली;ज्याच्य कल्याणाकरितां,आपणास ह्मातारपण आलें असतांही लढाईवर जाण्यास सिद्ध झालों, तो आपला खंडेराव आतां कर्ता झाला आहे,तर मी आरंभिलेलें कार्य आपल्या शिरावर घेऊन मला वृद्धपणीं सुख देईल, अशी ज्याविषयीं दृढ आशा आपल्या हृदयांत घट्ट धरून ठेविली होती तो एकाएकीं आपल्या समक्ष निर्दय काळानें ओढून नेला हें पाहतांक्षणींच सुभेदारांचें सर्व धैर्य खचून ते धाडकन् जमिनीवर पडले ! रणांगणांत ते प्रति-भीष्माचार्याप्रमाणें शूर होते व त्यांनीं हजारों शत्रूंस समरांगणीं कंठस्नान घातलें होतें; पण या वेळीं ते एकाद्या दीन मनुष्या-प्रमाणें पुत्राविषयीं विलाप करूं लागले. ‘ माझा मूर्तिमंत मनोरथच आज भंग पावला ! माझा प्रिय पुत्र मला शोक-सागरांत टाकून निघून गेला ! जो मी मेल्यावर माझी क्रिया करील व श्रांद्धांजलिदानानें स्वर्गलोकीं माझ्या आ-त्म्यास संतुष्ट ठेवील अशी ज्याची मला आशा होती त्याचीच क्रिया मला स्वतःला करण्याचा आज दुष्ट दैवानें प्रसंग आणिला अं ! ’ खरोखर पुत्रमोह फार कठिण आहे ! त्याच्या दुःखासा-रखें दुसरें दुःख नाहीं. तशांत मल्हाररावांस हा एकुलता एकच पुत्र होता ! मग त्यांच्या दुःखास काय विचारावें ! ते या असह्य दुःखाच्या भाराखालीं दडपून जाऊन बेशुद्ध होऊन पडले. जवळ दादासाहेब व शिंदे वगैरे पुष्कळ सरदार होते, पण ते काय करणार ! खंडेरावांच्या आकस्मिक मरणामुळें आपल्या कुटुंबांतीलच एक कर्ता पुरुष गेला असें त्यांस वाटून

तेही दुःखानें चूर होऊन गेले होते; तथापि त्यांनीं प्राप्तप्रसंगाचा विचार करून सुभेदारांच्या डोळ्यांस पाणी लावून सावध केलें; व दोन सामोपचाराच्या गोष्टी सांगून त्यांचा शोक कमी केला.

पण इतक्यांत दुसरा आकांत जो त्यांच्या पुढें दत्त ह्मणून उभा राहिला त्याचें कोठवर वर्णन करावें ? खंडेरावाच्या मृत्यूची वार्ता सुभेदारांच्या कुटुंबांत जाऊन पोचतांच त्यांची माता गौतमाबाई व पत्नी साध्वी अहल्याबाई हृदय पिटीतच तेथें आल्या. आपल्या पुत्राचें शव बघतांच एकाद्या दीन गाईप्रमाणें गौतमाबाईनें मोठ्यानें हंबरडा फोडला व त्याचे गुण आठवून ती आक्रोश करूं लागली ! माताच ती ! तिच्या प्रेमाची बरोबरी दुसऱ्या कशालाही येणार नाहीं !

आतां साध्वी अहल्येचा शोक कसा होता तो ऐकावा! तो भयंकर देखावा बघतांच तिच्या डोळ्यांवर एकदम अंधारी आली व मी खोल पातालांत जाऊन पडलें कीं काय असें तिला वाटलें ! मी आहें कोठें व करतें काय याचें तिला भानच राहिलें नाहीं ! ती आपल्या पतीचें शव मांडीवर घेऊन धाय मोकलून रडूं लागली ! 'आज माझ्या सौख्याचा शेवट झाला ! माझा आशावृक्ष दग्ध झाला ! माझा प्राण मला सोडून गेला ! !' असें ह्मणत ती थडाथड जमीनीवर डोकें आपटून घेऊं लागली व पतीच्या नाशास कारण झालेला जो सुरजमल्ल त्याला संतापानें शाप देऊं लागली.

या जगांत निदान आमच्या हिंदुस्त्रियांना तरी पति

हेंच केवळ त्यांचें सुख, त्यांचें दैवत, त्यांचें समाधान, फार काय, तोच त्यांचें जीवीत. त्याचा अंत झाल्यावर कोणत्या स्त्रीला, तशांत अहल्याबाईसारख्या पतिव्रतेला त्यावेळीं कोणाच्यानें दोन गोष्टी सांगून तिचें दुःख कमी करवेल! तिच्या अंगावर कोसळून पडलेलें आकाश दूर लोटून कोणाला तिची सुटका करतां येईल! अरेरे! असा प्रसंग एकाद्या वैऱ्याच्या स्त्रीवर यावा असें देखील कधीं कोणास वाटणार नाहीं! काय करावें! कोणी चतुर पुरुष या साध्वीवर एकादी कादंबरी किंवा नाटक लिहूं इच्छील तर, ऐन तारुण्याच्या भरांत तिजवर आलेल्या या दुःसह प्रसंगाचें वर्णन करणें त्यास कष्टतर वाटून तो आपल्या 'निरंकुशाः कवयः' या न्यायानें तिच्या पतीस जिवंत करून वाचकांच्या चित्तास समाधान देईल; निदान हा प्रसंग पुढें कांहींसा लांबणीवर तरी टाकून वेळ मारून नेईल. पण आह्मा चरित्रकारांस तसें करतां येणें अशक्य आहे! 'भवितव्यता बलीयसी' यात्र महाजनांच्या उक्तीची या प्रसंगीं आह्मी आपल्या वाचकांस आठवण करून देतों.

अहल्याबाईचा हृदयविदारण करणारा पतीविषयींचा आकांत सारखा चालू होता, व तो सर्व सरदार लोक ऐकत होते; पण तिचें शांतवन होण्याकरितां तिच्याशीं दोन शब्द बोलण्याचें धैर्य कोणासच होईना. त्यांनीं सुभेदारांस तसें करण्याविषयीं प्रार्थना केली; पण तिचा तरी उपयोग काय होणार? अहल्याबाईचा तो अनिवार शोक पाहून खंडेरावाच्या मरणापेक्षांही त्यांना अधिक दुःख झालें व त्यांच्या पोटांत भडभडून आलें!

तशांत आणखी सुरजमल्लास तिनें दिलेले शाप ऐकून त्यांना जो अपरिहार्य संताप झाला त्याच्या आवेशांत अभिमन्युबाळाच्या मरणानें कुपित झालेल्या अर्जुनानें जशी जयद्रथास मारण्याची प्रतिज्ञा केली तशी भयंकर शपथ त्यांनीं घेतली ते मोठ्या आवेशानें ह्मणाले 'माझ्या मुलाच्या मरणास प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें कारण झालेला जो दुष्ट सुरजमल्ल त्याचा शिरच्छेद करून कुंभेरीची माती यमुनानदींत फेकून देईन तरच मी मनुष्ययोनींत जन्मास आल्याचें सार्थक केले !'

साध्वी अहल्येच्या शोकाचें यापुढें अधिक वर्णन करण्यास आमची लेखणी चालत नाहीं. बराच वेळ झाल्यावर आतां दुर्दैवानें प्राप्त झालेल्या प्रसंगाच्या पुढल्या तजविजीला लागलें पाहिजे असा सर्वांनीं विचार करून दुःख किंचित् कमी करण्यास अहल्याबाईस विनंति केली, व तीही आपण शुद्धीवर आल्यासारखें दाखवून सर्वांस ह्मणाली कीं, परमेश्वराच्या इच्छेस जें आलें त्याला दोष देण्याची कोणाची प्राज्ञा आहे? असो. तुमच्या सर्वांच्या इच्छेप्रमाणें हा मी सर्व शोक गिळून टाकला. आतां माझ्या धर्माप्रमाणें मला आपली पुढली व्यवस्था करण्याकरितां तुमची आज्ञा व्हावी. मी तुमची सर्वांची धर्माची कन्या आहें. मजवर आजपर्यंत जसा लोभ ठेविलात तसा पुढेंही ठेवा. मी आतां आपल्या पतीच्या शवाबरोबर सहगमन करणार. असें त्यांस ह्मणून ती सासूसासऱ्यांपाशीं आली व त्यांच्याजवळ आपल्या दोन्ही मुलांना देऊन 'इहलोकीं नाहीं तर नाहीं, पण स्वर्गलोकीं तरी पतीशीं माझा चिरकाल योग घडण्याविषयीं आपला आशीर्वाद असावा,' असें ह्मणून तिनें त्यांच्या पायांवर डोकें ठेविलें.

मल्हाररावांनीं आपल्या प्रिय स्नुषेच्या तोंडातले हे शब्द ऐकिले मात्र, तोंच त्यांच्या काळजानें ठाव सोडिला ! आपण कोण व करितों काय याचें त्यांस भान न राहून त्यांनीं एकदम तिच्या गळ्याला मिठी मारिली व दुःखाच्या हुंदक्यानें तिला ते ह्मणाले, 'अहल्ये, बाई, हा काय गे तूं असला विचार मांडिला आहेस ? माझा पुत्र तर गेलाच, आणखी त्याच्या बरोबर आतां तूंही जाऊन मला उघडा करतेस काय ? या तुझ्या ह्मातार्‍या सासूसासर्‍यांकडे पहा. तूं असलीस तर, अहल्या नाहीं, आमचा खंडेरावच जिवंत आहे असें आह्मी समजूं, तर असें करून तूं आणखी आह्मांला शोकांत लोटूं नको, व ह्या तुझ्या अर्भकांना अनाथ करूं नको'.

याप्रमाणें अंतःकरणाच्या खर्‍या कळवळ्यानें सुभेदारांनीं वरील भाषण केलें व दुसर्‍या सर्व लोकांनीं तिला तसेंच सांगितलें, तरी तिचा निश्चय फिरतां दिसेना. 'पतीच्या मागें या भयाण झालेल्या जगांत आतां माझी राहण्याची शोभा नाहीं. माझी ही दुःखद स्थिति पाहून पुढें तुमच्या दुःखांत आणखी भर पडेल,' असें ती मोठ्या नम्रतेनें सासर्‍यास ह्मणाली; तेव्हां मल्हाररावांचें धैर्य खचून त्यांनीं कपाळावर हात मारिला व ते पुनः ह्मणाले, 'अहल्ये, तूं असा अविचार केलास तर त्याचा परिणाम मला भोगावा लागणार. तूं गेल्यावर माझें या जगांत कांहीं राहिलें नाही. मीही तुझ्यामागें अग्निनारायणास आपल्या देहाची आहुति देणार हें खचित समज.'

आपल्या सासर्‍याचे हे निर्वाणीचे शब्द ऐकून बिचार्‍या

अहल्येची स्थिति भांबावल्यासारखी झाली. आतां जगावें तर पतिव्रताधर्मांचें चीज करून घेण्याची आलेली अमूल्य संधी पुनः येणार नाहीं, व मरावें तर आपणाकरितां एका सबंध राजकुटुंबाचा घात केल्याचें पातक आपल्या माथीं बसणार; कारण सुभेदारांनीं ह्मटल्याप्रमाणें केल्यावर आपली सासूही मागें आपली हीच वाट करून घेणार. मग माझ्या तान्ह्या मुलांची कोण काळजी करितो? जिवंत राहिलें तर शुद्धाचरणानेंही पातिव्रत्याचें चीज करितां येईल; पण इतक्यांची हत्या नको. असा दूरवर आणि पोक्त विचार करून तिनें सासऱ्याच्या इच्छेचा आदर केला.

नंतर रीतीप्रमाणें सुभेदारांनीं खंडेरावाच्या प्रेतास अग्नि देऊन त्या दुःखाच्या दिवसाचा शेवट केला; व प्रिय पुत्राचें कांहीं तरी स्मारक या जगांत असावें अशा हेतूनें जेथें खंडेरावास दहन केलें तेथें एक भव्य छत्री उभारून तिच्या खर्चाकरितां कांहीं गांव इनाम करून दिले, ते अद्यापि तसेच निर्वेधपणें चालू आहेत.

खंडेरावाचा अल्पवयांत झालेला मृत्यु त्याच्या कुटुंबासच काय पण आपणां सर्व महाराष्ट्रीयांसही अत्यंत हानिकारक झाला असें ह्मटलें पाहिजे. सुदैवानें तो आणखी कांहीं वर्षें जगांत असता तर खचित आपल्या पित्याप्रमाणें नांवलौकिक संपादून या भरतभूमीचें कल्याण करता, व त्याच्या लहानपणांतल्या उमेदीवरून आपणांस अशी कल्पना करणेंही अयोग्य होणार नाहीं. पण तिचा आतां उपयोग काय? परमेश्वराची तशी इच्छा नव्हती.

मल्हाररावांनीं सुरजमल्लाचा शिरच्छेद करण्याची रागाच्या आवेशांत शपथ घेतली ह्मणून वर सांगितलें आहे. ती त्यांच्याकडून सिद्धीस जाणें मुळींच अशक्य नव्हतें, व हें त्यांच्या शत्रूसही कळून चुकलें होतें. पण सुरजमल्लानें आपली कपटविद्या लढवून युक्तिप्रयुक्तीनें श्रीमंतांच्या बलिष्ठ सरदारांत वितुष्ट पाडण्याचा प्रसंग आणिला, त्यामुळें त्यांना त्या शपथेपासून माघार घेणें भाग पडलें. याविषयींची सर्व हकीकत सुभेदारांच्या चरित्रांत आहे, पण ती येथें देणें अप्रासंगिक होईल, ह्मणून ती त्यांतूनच वाचण्याविषयीं वाचकांस शिफारस करितों.

भाग पांचवा समाप्त.

# भाग ६ वा.

## मल्हाररावांचा मृत्यु.

खंडेरावाचें उत्तरकार्य आटपल्यावर श्रीमंतांची ही मोहिम तितकीच राहिली. सुभेदार आपल्या सर्व कुटुंबासह इंदुरास येऊन दाखल झाले. पुत्राच्या मरणामुळें या वेळीं त्यांच्या मनाला जरी अतिशय उदासीनता आली होती, तरी जात्याच ते मोठे धैर्यशाली व विचारी असल्यामुळें पुत्रमरणानें झालेल्या अनिवार्य शोकाची वारंवार आवृत्ति न करितां बोलल्याप्रमाणें अहल्याबाईसच खंडेरावाच्या ठिकाणीं समजून अंगीकारिलेल्या स्वदेशकल्याणाविषयीं मोठ्या उत्साहानें हातांत तलवार धरण्याचा पुनः त्यांनीं निश्चय केला.

पण बिचाऱ्या साध्वी अहल्याबाईला तसें थोडेंच करतां येण्यासारखें होतें! इंदुरास येऊन पोंचल्यावर आपल्या वाड्यांत पाय टाकतांच तिला पुनः दुःखानें घेरिलें. ज्या घरीं आजपर्यंत लक्ष्मीप्रमाणें ती सौभाग्यानें नांदत होती त्याच ठिकाणीं आतां वैधव्यस्थितींत काळ्या तोंडानें राहवें लागणार ह्मणून तिला अतिशय दुःख झालें. तसेंच पतीसहवर्तमान ज्या ठिकाणीं तिनें अनेक प्रकारचे विलास केले तो आरसेमहाल अवलोकन करतांच त्याचें स्वरुप भयंकर दिसून तिच्या हृदयांत वारंवार भडभडून येऊं लागलें!

आणि असें सांगतात कीं, त्या दिवशीं तिनें त्या महालास एकवार जें कुलूप लाविलें तें आमरण पुनः काढिलें नाहीं!) सुभेदारांच्या पदरच्या सरदारांच्या स्त्रिया, ज्या तिच्या मैत्रिणी झालेल्या होत्या, त्यांना हा तिजवर गुदरलेला प्रसंग पूर्वीच कळून चुकला होता, ह्मणून तिचें शांतवन करण्याकरितां ती वाड्यांत आल्याचें वर्तमान कळतांच त्या तिला भेटण्यासाठीं आल्या, तेव्हां तर तिला जें कांहीं झालें तें सांगतां येत नाहीं! 'पतीसह आपण ऐश्वर्यानें नांदत असतां अंगावर अनेक हिऱ्यामोत्यांचे अलंकार घालून मोठ्या डौलानें मी ज्यांना अनेक विचाराच्या गोष्टी सांगितल्या, व आपल्या हातानें ज्यांच्या कपाळीं अनेक वेळां हळदकुंकू लावून त्यांची प्रसंगोचित थट्टा केली, त्यांना आतां मी या फुटक्या कपाळानें कशी भेटूं? ऐन तारुण्यांत जिचा गुणवान् पतीनें त्याग केला अशी ही अहल्या खचित पूर्वजन्मींची महापातकी आहे, तर इची संगतिही आपल्या उपयोगी नाहीं, असें नानाविध कुतर्क त्यांच्या मनांत येऊन पूर्वी जो माझा त्यांणीं आदर केला त्याबद्दल आतां त्या तिरस्कार तर करणार नाहींत'? असे विचार तिच्या मनांत येऊन ती दूर वाड्यांतल्या एका अंधाऱ्या खोलींत जाऊन बसली, ती बरेच दिवसपर्यंत बाहेर आली नाहीं! पतिनिधनानें कुलीन स्त्रियेची अशी स्थिति होणें साहजिक आहे, याबद्दल तिला दोष देतां येत नाहींच. उलट ह्या आचरणानें तिचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच वाटतें. असो.

वर्षसहामहिने लोटल्यानंतर सुभेदारांस पुनः आपल्या धन्याच्या कामगिरीवर जाण्याचा प्रसंग आला; त्या वेळेस त्यांनीं

आपला सर्व विश्वास या प्रिय स्नुषेवर टाकिला. राज्याची सर्व व्यवस्था पाहण्याकरितां दिवाण गंगाधर यशवंत यास नेमून त्यानें उत्पन्न झालेला सर्व पैसा तिच्या स्वाधीन करीत जावा व नेहमीं तिच्या आज्ञेप्रमाणें चालावें अशी व्यवस्था करून ते निघून गेले.

मल्हारराव गेले ते कोणत्या मोहिमेवर गेले हें सांगितलें असतां आह्मी विषयांतर केलें असें वाचकांस वाटेल हें आह्मी जाणून आहों. तथापि कोणी एकादा सरळ मार्गानें वाट चालत असतां त्या वाटेंत मध्येंच पूर्वी त्याची कांहीं हानि झालेली असली, तर त्या वेळीं कारण नसतां त्या ठिकाणीं पोंचतांच जसा पूर्वीचा भयंकर प्रसंग आठवून त्याच्या मनास क्षणभर दुःख झाल्यावांचून राहात नाहीं, तद्वत् आह्मी आमच्या चरित्रनायिकेचें चरित्र सरळ रीतीनें लिहीत असतां ज्या सुमारास आह्मां महाराष्ट्रीयांची भयंकर हानि होऊन जिनें वैभवशिखरावर पोंचलेल्या आह्मांस पुनः खालीं खोल खाड्यांत ढकलून दिलें व खंडेराव यांच्या मरणजन्य दुःखाचें वर जें वर्णन केलें त्याच्या लक्षपटीनें जरी जिचें दुःख वर्णन केलें तरी संपणार नाहीं, तिची या वेळीं आह्मांस कशी स्मृति होणार नाहीं? वाचकहो! ती हानि ह्मणजे पानिपतच्या लढाईचा भयंकर परिणाम होय, हें तुह्मांस निराळें सांगणें नको. शिवाय त्या वेळीं श्रीमंतांच्या सेनानीस कुबुद्धीनें घेरून त्यांस पदोपदीं या आपल्या एकनिष्ठ सेवकाचा अपमान करण्याची कशी बुद्धि झाली व त्यामुळें सुभेदारांस कितो वाईट वाटलें वगैरे सर्व हकीकती सुभेदारांच्या चरित्रांत आल्या आहेतच; त्यांची

येथें पुनरावृत्ति करणें नको; तरी त्या वेळीं अहल्याबाईवर सर्व राज्याची व्यवस्था त्यांनीं सोंपविली असल्यामुळें त्यांना तिकडची काळजी कधींही वाटली नाहीं. यावरून आमच्या चरित्रनायिकेची योग्यता किती होती याची वाचकांस चांगली ओळख पटणार आहे. आतां तिनें ती व्यवस्था कशी राखिली हें तुह्मांस पुढें क्रमानें कळेलच.

अहल्याबाईचा पहिल्यापासूनच देवाकडे व दानधर्माकडे विशेष कल होता; व तो मल्हाररावांनाहीं माहीत होता; ह्मणून त्यांनीं पानिपतच्या मोहिमेवर जातेवेळीं तिच्या जिवास समाधान वाटावें ह्मणून बरीच मोठी खाजगी नेमणूक तिच्या मनास वाटेल त्याप्रमाणें दानधर्माकडे खर्च करण्याकरितां तिला करून दिलेली होती, व त्याप्रमाणेंच तिनेंही तिचा सत्कार्याकडे व्यय केला. ब्राह्मणांचे ठिकाणीं तिची फार श्रद्धा असे. ती नित्य अनेक प्रकारचीं गोप्रदानें वगैरे देऊन त्यांचें मन संतोषित ठेवीत असे व तेणेंकरून आपल्या जीविताचें सार्थक्य झालें असें मानीत असे. शिवाय, इतका जरी तिचा दानधर्माकडे ओढा होता, तरी राज्याचा जो वसूल दिवाण गंगाधर यशवंत तिच्या स्वाधीन करीत असे त्यांतला एक छदामही तिनें कधीं खर्च केला नाहीं. दरसालच्या दरसाल सर्व वसूल मल्हारराव ज्या ठिकाणीं असत तेथें बिनहरकत पोंचता होत असे, व सरकारी कामाकडे जो खर्च झाला असेल त्याचा खडानखडा हिशेब तिच्या हातचा मांडिलेला त्यांस मिळत असे. तिच्या कारभारांत राज्यांत कोणाची कोणत्याही प्रकारची पैशा-संबंधानें किंवा दुसऱ्या गोष्टीच्या संबंधानें कुरकूर कधीं मल्हार-

रावांच्या कानावर गेली नाहीं. या प्रमाणें राज्यकारभार उत्तम प्रकारें बजावूनही दरसाल खजिन्यांतील शिलकेंत लाख दोन लाख रुपये आपले वाढावयाचेच. आपल्या सुनेची राज्यव्यवस्था बघण्याची ही उत्तम रीतीची टापटीप पाहून सुभेदारांस अत्यानंद होई, व ते वारंवार असें ह्मणत कीं, दौलत मिळविण्यास जरी माझा प्रारब्ध योग आणि पराक्रम हे कारणीभूत असले तरी तिची व्यवस्था कशी करवी तें मला कांहीं कळत नाहीं, तें माझ्या अहल्याबाईसच ठाऊक ! इतक्या अल्पवयांत अहल्येच्या अंगीं राज्यकारभार सुव्यवस्थितपणें चालविण्याचें ज्ञान एकाद्या चतुर मुत्सद्याप्रमाणें आहे या गोष्टीबद्दल व तिच्या अंगीं असलेल्या इतर सद्गुणांबद्दल ते आपल्या जवळच्या सर्व लोकांजवळ तिची तारीफ करीत व त्या योगानें मनास फार आनंद मानून घेत. एकंदरींत ती त्यांना इतकी प्रिय झाली होती कीं तिच्या मनास कोणत्याही रीतीनें वाईट न वाटूं देण्याची ते फार खबरदारी घेत. राज्यसंबंधानें अशी वाहवा एकाद्या मोठ्या चतुर मुत्सद्यालाही मिळणें कठिण आहे. असो.

पानिपतच्या भयंकर संग्रामांत आपल्या लोकांचा झालेला पराभव व त्यामुळें शत्रूंनीं केलेली त्यांची विडंबना या गोष्टी ऐकून ह्या साध्वीस अतिशय दुःख होऊन रडें कोसळलें. त्या घोर रणसंग्रमांतून दैवानें वांचून वस्त्रहीन झालेले व अंगावर शस्त्रांच्या जखमा पडलेले जे लोक दक्षिणेंत येतांना इंदुरास आले त्यांविषयीं तिनें फारच कळकळ दाखविली. आपल्या पदरच्या लोकांकडून त्यांना अन्नवस्त्राचा भरपूर पुरवठा करून व त्यांच्या औषधोपचाराची सर्व तजवीज करून त्यांना बरें केलें, आणि

मोठ्या सन्मानानें त्यांस त्यांच्या कुटुंबांत पोंचतें केलें. आह्मां दक्षिणेंतील लोकांस या साध्वीच्या उदार स्वभावाची प्रथम जी ओळख झाली ती याच वेळीं होय, व ती उत्तरोत्तर तशीच वाढत गेली. त्यांच्या मनांत तिजविषयींची कृतज्ञता राहिली यांत नवल नाहीं; पण तिच्या पुण्याईनें त्यांच्या वंशजांच्याही मनांत अद्यापि ती कायम राहिली आहे. पानिपतास पराभव झाल्यावर मल्हारराव इंदुरास न जातां आपल्या धन्याचें शांतवन करण्याकरितां परभारें पुण्यास गेले. त्यानंतर परत आलेल्या लोकांनीं त्यांच्याजवळ त्यांच्या सुनेच्या भूतदयेची वाखाणणी केली त्या योगानें त्यांना आनंद झाला यांत विशेष नाहीं; पण खुद्द श्रीमंतांस देखील आनंद होऊन त्यांनीं तिजविषयीं आपली कृतज्ञता भरदरबारांत प्रदर्शित केली. तेव्हां सुभेदारांना जो आनंद झाला, तो पूर्वींच्या किती पटीनें तरी अधिक असला पाहिजे बरें ? असो. नंतर याच पराभवाच्या दुःखानें लवकरच श्रीमंत नानासाहेबांचा काळ झाला; तेव्हां मल्हारराव आपल्या मुलखीं परत गेले. या वेळीं आमच्या चरित्रनायिकेचा मुलगा मालीराव हा बारा वर्षांचा झाला होता, व मुलगी मुक्ताबाई हिला नववें वर्ष लागलें होतें. दोघेंही लग्नाला योग्य झालीं होतीं; तेव्हां त्यांचीं लग्नें करून आपल्या ह्मातारपणचें शेवटचें सुख पाहण्याचा व अहल्याबाईचें प्रिय करण्याचा त्यांचा विचार झाला. मग त्यांनीं आपल्या योग्यतेनुरूप मालीरावास नवरी व मुक्ताबाईस नवरा पाहून त्यांचीं लग्नें केलीं. रीतीप्रमाणें दोन्ही समारंभ मोठ्या थाटानें पार पडले. मालीरावास कोणाची मुलगी केली यासंबंधानें

कोठें कांहीं माहिती मिळत नाहीं. मुक्ताबाई इंदुरापासून पंधरा कोसांवर नर्मदातीरीं महेश्वर ह्मणून शहर आहे, तेथील यशवंतराव पानसे या नांवाच्या एका जहागीरदाराच्या मुलाला दिली होती.

एकाद्या साधारण स्त्रीला आपल्या मुलांचें लग्न होऊन त्याच्या दोन हातांचे चार हात झाले व घरांत सून आली ह्मणजे एक प्रकारचा मोठेपणा वाटतो, व तत्संबंधीं संसारिक सुखाविषयीं तिच्या मनाची प्रवृत्ति दृढ होते; पण आमच्या चरित्रनायिकेस जेव्हां तिचा पतीशीं वियोग झाला, तेव्हांच जगांतलें आपलें सर्व सुख व मोठेपणा आपणास अंतरला, असें पुरें वाटून राहिलें होतें, व तें आमरण कायम होतें. कन्यापुत्रांचीं लग्नें झाल्यामुळें तिची संसाराकडे कोठून प्रवृत्ति होणार ? पति मेल्यापासून तिनें आपल्या सर्व अलंकारांचा व उंच प्रतीच्या वस्त्राभरणांचा त्याग केला. त्या दिवसापासून तिनें रंगाचें ह्मणून वस्त्र कधीं परिधान केलें नाहीं. व अंगावर एकही अलंकार घातला नाहीं, इतकेंच नव्हे, तर जेवणांत देखील गोड पदार्थ व मद्यमांस यांचें कधीं सेवन केलें नाहीं. पति मेला तेव्हां मुलें लहान होतीं, तीं मोठीं होत तोंपर्यंत त्यांचें लालनपालन मोठ्या दक्षतेनें केलें, व त्यांचीं लग्नें करून दिलीं. आतां आपल्या देहाचें कांहींतरी सार्थक्य केल्याखेरीज जगांत राहून कांहीं अर्थ नाहीं, असा त्या साध्वीनें विचार करून आपलें अवशिष्ट आयुष्य सद्धर्माचरणांत घालविण्याकरितां एकाद्या पुण्यक्षेत्रांत मला जाऊन राहूं द्या. अशी सासुसासऱ्यांस विनंति केली; व तिच्या ह्या सद्विचाराच्या आड

न येतां त्यांनींही ती मान्य केली. तथापि सुभेदारांनीं जो तिजवर एकदा राज्यभार टाकला तो पुनः आपणाकडे घ्यावयाचा नाहीं असा निश्चय केला. तिची मुलगी जेथें दिली होती तें महेश्वर शहर नर्मदेच्या कांठीं असल्यामुळें क्षेत्रच होतें व त्यांच्या राजधानीपासूनही तें फार लांब नव्हतें, ह्मणून तेंच तिला राहण्याकरितां त्यांनीं पसंत केलें, व केवळ देवाच्या आज्ञेप्रमाणें आपल्या वडील माणसांची आज्ञा पाळण्याविषयीं तत्पर असणाऱ्या अहल्याबाईनें तेथेंच राहण्याविषयीं आपला निश्चय केला. नंतर पूर्वीपेक्षांही बरीच मोठी रक्कम तिला दानधर्म करण्याकरितां नेमून देऊन तिची महेश्वरास रवानगी केली.

सुभेदारांनीं आपल्या स्नुषेसाठीं महेश्वराची जी निवड केली ती खरोखरच चांगली होती. हें शहर मोठें असून नर्मदेसारख्या महानदीच्या योगानें त्यास नैसर्गिक पवित्रता व रमणीयता आलेली आहे. पुराणांतरीं ठिकठिकाणीं ज्या माहिष्मती नगरीचें नांव ऐकूं येतें तीच नगरी हें सांप्रतचें महेश्वर शहर होय. असो. तेथें जाऊन राहिल्यापासून आमच्या चारित्रनायिकेचा नित्यक्रम कसा होता हें प्रथम सांगितलें पाहिजे. पाहाटेच्या प्रहररात्रीं ती निजून उठत असे. नंतर प्रातर्विधि व स्नान आटपून देवपूजा करी; त्या कर्मांतच तिचा सकाळचा सर्व वेळ मोडे; नंतर ब्राह्मणांस गोप्रदानें देई. इतक्यांत दोनप्रहर होत; त्यानंतर ती भोजन करीत असे. भोजन झाल्यावर किंचित् वामकुक्षि करून तिला भेटावयास कोणी आल्यास त्यांच्याशीं गोष्टी करी. नंतर त्या ठिकाणीं अंबादास ह्मणून एक मोठा कर्मठ व विद्वान् ब्राह्मण होता त्यापासून पुराण ऐके, तों सायंकाळ होई; नंतर देव-

दर्शन घेऊन रात्रीचा फराळ करीत असे व नंतर परमेश्वराची स्तोत्रें वगैरे ह्मणून निद्रा घेई. पति मरण पावल्यापासून आपल्या धर्मांत सांगितलेले सर्व उपासतापासादि वैधव्यधर्म ती मोठ्या कडकडीत रीतीनें पाळीत असे, व कसाही प्रसंग आला अथवा शरीरास असमाधान वाटले तरी त्यांत अंतर पडूं देत नसे. वाचक हो ! या आमच्या चरित्रनायिकेशिवाय कोणत्या दुसऱ्या राजस्त्रियेकडून अशीं देहदंडाचीं साधनें घडलीं असतील बरें ?

अहल्याबाईनें संसाराचा सर्व उपद्याप सोडून रेवातीरीं वास केला व आपलें आयुष्य दानधर्मादि पुण्यकर्मांत घालविण्याचा निश्चय केला आणि बरेच दिवस तदनुसार आचरण ठेवून आपल्या राज्यांत मोठी कीर्ति संपादन केली. तरी ईश्वरीसंकेत कांहीं याहून निराळाच होता कीं त्यायोगानें ती पुनः राज्यकारभारांत पडून तिची दिगंत कीर्ति झाली तो प्रकार असा. सुभेदारांस उत्तरहिंदुस्थानांत पुनः मोहिमीवर जाण्याविषयीं श्रीमंतांकडून पत्र आलें. या वेळीं त्यांचें ह्मातारपण झाल्यामुळें ह्मणा, अथवा कमींत कमी चाळीस वर्षें युद्धाच्या श्रमांत घालविल्यामुळें ह्मणा, त्यांच्या प्रकृतीस क्षीणता आली होती व त्यामुळें शरिरीं असमाधान वाटत असून युद्धाविषयीं त्यांस मुळींच उत्साह राहिला नव्हता; तथापि धन्याची आज्ञा पाळण्याविषयीं ज्यांचा कृतसंकल्प ते अशा प्रसंगीं आपल्या शरीराची थोडीच पर्वा करणार ? त्यांचा पुतण्या तुकोजी हा नेहमीं त्यांच्या बरोबर असे; शिवाय या वेळीं त्यांनीं आपल्या नातवास ह्मणजे मालीरावासही बरोबर घेतलें, व पूर्वीप्रमाणेंच राज्याची सर्व व्यवस्था अहल्याबाईच्या अंगावर टाकून व दिवाण गंगाधरपंत यांस तिच्या आज्ञेनें

बालवयास सांगून आपण उत्तरहिंदुस्थानांत श्रीमंत दादासाहेब व शिंदे यांस जाऊन मिळण्याकरितां निघून गेले.

नंतर बरेच दिवस लहान मोठ्या लढाया झाल्या, त्यांत सुभेदारांस विशेष श्रम झाल्यामुळें त्यांची प्रकृति बिघडून ते अलमपुरास आले. तेथें त्यांच्या कानास ठणका लागून त्याच्या वेदना असह्य झाल्या. पुष्कळ औषधोपचार केले. पण गुण न पडून त्यांस ज्वर येऊं लागला, व त्यांतच त्यांचा अंत झाला. मरतेवेळीं त्यांनीं तुकोजीचा हात आपल्या नातवाच्या हातांत घालून त्याचें पालन करण्यास सांगितले व अहल्येची मर्जी राखण्याविषयीं फार सावधागिरीनें राहण्यास सांगितले व तें तुकोजीरावानें त्यांच्या आज्ञेप्रमाणें पाळिलें. याप्रमाणें चाळीस वर्षें ज्यानें युद्धांत घालवून आपल्या धन्याचें राज्य व ऐश्वर्य वाढविलें, सर्व शत्रूंचा निः पात करून अक्षय्य कीर्ति मिळविली व अनेक लोकांचें कल्याण करून त्यांची प्रीती संपादन केली; जो केवळ एका यःकश्चित धनगराचा मुलगा असून सांप्रत एका मोठ्या संस्थानचा अधिपती झाला, तो मल्हारराव होळकर मृत्युपावल्यामुळें सर्व सरदारास व विशेषें करून दादासाहेबांस फार वाईट वाटलें. सर्व सरदारांत वडील हाच होता व त्या नात्यानें तो सर्वांस दोन विचाराच्या गोष्टी सांगत असे. खुद्द श्रीमंतांच्या घरांतील सर्व माणसें त्यास परका असे न लेखतां आपल्या कुटुंबांतीलच समजत व तदनुसार त्याचा सन्मान ठेवीत. असो. दादासाहेबांनीं सुभेदार वारल्यानंतर इंदुरच्या गादीची वस्त्रे लागलीच मालीरावास दिलीं व तुकोजीरावास त्याचे पालक नेमिले.

मल्हाररावांच्या नंतर थोड्याच दिवसांत त्यांच्या स्त्रीचेंही देहावसान झालें. उभय प्रसंगीं आमच्या चरित्रनायिकेस जें दु:ख झालें तें सांगतां येत नाहीं. वडील ह्मणून तिजवर ममता करणारीं तेवढींच माहिलीं होतीं. ती दोघे सोडून गेल्यामुळें तिला मी अगदीं उघडीं पडलें असे वाटूं लागलें. तथापि ही मृत्युलोकची वस्ति आहे. बोलावणें आलें ह्मणजे कोणालाही गेलें पाहिजे त्यावांचून गत्यंतर नाहीं असा विचार करून तिनें त्यांचें वियोगदु:ख सहन केलें व पुत्राच्या कारकीर्दीची उत्तम व्यवस्था करून देण्याकरितां कांहीं दिवस ती महेश्वर सोडून पुन: इंदुरास येऊन राहिली.

भाग सहावा समाप्त.

# भाग ७ वा.

## पुत्रशोक.

---:०:---

वाचकहो, तुह्मांस कधीं हिमालयपर्वतासारख्या एकाद्या अति उंच पर्वतावर चढण्याचा प्रसंग आला असल्यास त्या-वेळीं जशी तुमच्या मनाची स्थिति झाली असेल तशीच साध्वी अहल्याबाईचें चरित्र वाचतांना होत असेल. सपाट भूमी-वरून डोंगराची जी उंची दिसते तितकी चढून गेल्यावर त्यावरच्या रम्य स्थळीं जाऊन पोंचूं अशी आपल्या मनाची खात्री करून तुह्मी मोठ्या झपाट्यानें तो अवघड मार्ग चालून जातां; पण लवकरच त्या ठिकाणीं असलेला तितक्याच उंचीचा कडा पाहून तुमच्या मनास उदासीनता प्राप्त होते; तथापि हा एवढा कडा चढून गेलों कीं खचित आपलें इच्छित स्थळ आपण जाऊन गाठूं अशी खात्री मानून पुनः उत्साहानें तो कडा धापा टाकीत चढून जातां; पण उपयोग काय! तो संपल्यावर त्याहून भयंकर असा त्या वरचा तिसरा कडा दृष्टीस पडतांच तुह्मी पूर्ण निराश होऊन हातपाय गाळितां. तद्वतच या आमच्या चरित्रां-तील एकादा दुःखाचा भाग पाहून हा संपल्यावर पुढें आनं-दाचा भाग असेल अशा आशेनें तो भराभर संपवाल, पण पुढें दुसरा दुःखाचा भाग पाहतांच तुमचा हिरमोड होईल; तरी पण हा आणखी एवढाच दुःखाचा भाग असेल अशा कल्पनेनें पुढील

आनंदाच्या भागावर नजर ठेवून तो वाचण्याचे श्रम कराल. पण शेवटीं तो संपतांच जेव्हां त्याहून अधिक दुःखाचा तिसरा भाग तुमच्या समोर येऊन उभा राहिलेला पहाल, तेव्हां तुमच्या मनाची अगदीं विलक्षण स्थिति होऊन त्रासानें तुह्मी पुस्तक फेकून द्याल; अथवा या चरित्रकारानें वारंवार दुःखाच्या हकीकती देऊन चरित्र भरून टाकण्याची शपथच घेतली आहे कीं काय कोणजाणे, असा त्यावर दोषारोप कराल; हें आह्मी पूर्ण जाणून आहों. पण याविषयीं तुह्मीच आपल्या मनाशीं विचार करा कीं. यास आमचा कांहीं उपाय आहे कां? आमच्या चरित्रनायिकेवर खरोखरच तसे घडून आलेले दुःखाचे प्रसंग आह्मी या चरित्रांतून वगळले तर मग या चरित्राची किंमत ती काय राहिली? तर परमेश्वरानें अनेक प्रकारचीं दुःखें भोगण्यासच तिला जन्म दिला होता. अथवा अनेक दुःखांच्या भट्टींतून तिची सुवर्णासारखी निर्दोष व सुंदर मूर्ती तावून काढून तिला जगाच्या कष्टमय आणि खडतर कसोटीस पुरें उतरवावयाचें त्याच्या मनांत होतें तें तुह्मांकडून अथवा आह्मांकडून थोडेंच मिथ्या करवणार आहे? असो. अशा विचारानें मनाची एकाग्रता करून आणखी पुढील दुःखाचे प्रसंग वाचण्यास तयार व्हा.

सुभेदारांचा काळ झाल्यावर श्रीमंत रघुनाथरावदादासाहेबांनीं होळकरांच्या गादीचीं वस्त्रें आमच्या चरित्रनायिकेचा पुत्र मालीराव होळकर यास दिलीं असें मागच्या भागांत सांगितलेंच आहे. तो मालीराव आतां इंदुरांत राहून होळकरांच्या गादीचा उपभोग घेऊं लागला. गादीवर बसण्यापूर्वी तो आपल्या आज्याप्रमाणें व बापाप्रमाणें शूर दिसत होता, व पतीच्या अकालिक

मरणानें झालेलें होळकरशाहीचें नुकसान आपला हा पुत्र आपल्या शौर्यानें व प्रजापालनानें भरून काढून मला सुख देईल अशी साध्वी अहल्याबाईनें आशा केली होती! पण ही आपली आशा सर्वथैव खोटी आहे असें तिच्या पुत्रानें—अथवा दुर्दैवानेंच कां ह्मणाना—लवकरच तिच्या प्रत्ययास आणून तिला शोकार्णवांत बुडवून टाकिलें! त्या साध्वीचा दानधर्माकडे ओढा विशेष, ह्मणून सुभेदारांनीं तिला बरीच मोठी त्या कृत्याकडे खर्च करण्याकरितां नेमणूक करून दिली होती. पण परोपकाराकडेच जिनें आपलें तनमन लाविलें तिला अशी मोजकी नेमणूक कशी पुरी पडणार? तथापि सासूसासरे जिवंत होते तोंपर्यंत तिनें त्यांतच आपलें समाधान मानून त्यांच्या मनास अधिक त्रास दिला नाहीं. पण आतां त्या उभयतांचा काळ झाला व सर्व लक्ष्मी तिच्या हातांत आली. मग ज्या दानधर्माकडे तिचा स्वाभाविक ओढा, तो आपल्यापायीं तिची सर्व दौलत खर्चीं घातल्यावांचून तिला स्वस्थ कसें बसूं देणार? साध्वी अहल्याबाईनें पूर्वींपेक्षां अधिक दानधर्म करण्याचा आतां नित्यक्रम सुरू केला. तिच्या या सत्कृत्यामुळें तिच्या जिवास समाधान वाटलें पाहिजे होतें; पण गादीवर जे तिचे चिरंजीव विराजमान झाले होते त्यांच्या कृतीनें तिला उलटा ताप झाला. मालीरावास गादी मिळाल्यापासून तो वेडेवेडे चार करूं लागला व मनास वाटेल त्याप्रमाणें भलभलतें आचरण करूं लागला. तथापि या त्याच्या बहुतेक आचरणांत पापकर्मापेक्षां वेडसरपणाचाच पुष्कळ भाग होता.

त्याची आई ह्मणजे केवळ परोपकाराकरितां अवतीर्ण

झाली होती. व त्यांत सर्व आयुष्य घालविण्याचा तिचा दृढ निश्चय झाला होता. तिची ब्राह्मणावर अत्यंत भक्ति व पुरा विश्वास असे. त्यांस ती नित्य हजारों गोप्रदानें देऊन संतुष्ट करीत असे, व त्यामुळें तिची चहूंकडे वाहवा होत असे. पण वेड लागलेल्या मालीरावास त्यापासून कसा आनंद व्हावा? त्यानें पापबुद्धीनें नाहीं तरी, कुचेष्टेनें ब्राह्मणांस त्रास देऊन त्यांचे अभिश्राप घेण्यास आरंभ केला. अहल्याबाई ब्राह्मणांस नित्य गोप्रदानें व जोडे दान करीत असे. त्या दानपात्रांत व जोड्यांत हा विंचू घालून वर रुपये मांडून ठेवी आणि ब्राह्मणांस घ्यावयास सांगे. मग त्यांनीं त्यांत हात व पाय घातला असतां त्यांस विंचू दंश करीत व त्या वेदनेनें ब्राह्मण तडफडूं लागले ह्मणजे हा खदखदां हंसे व आनंदानें टाळ्या वाजवी. या विघ्नसंतोषीपणानें व व्रात्यपणानें मालीरावास जितकें समाधान होई त्याहूनही अधिक दुःख ब्राह्मणांस पूज्य मानणाऱ्या साध्वी अहल्याबाईस होई. ‘ माझ्या हातून पूर्व जन्मीं असें कोणतें खडतर पाप घडलें होतें कोण जाणे कीं, त्याबद्दल माझा सूड घेण्याकरितां परमेश्वरानें या राक्षसास माझ्या पोटीं जन्मास घातलें. आतां हा भोग संपणार तरी कधीं ? ’ असें ती वारंवार ह्मणत असे व त्या ब्राह्मणांची क्षमा मागत असे. मालीराव खरोखरीच वेडा बनला असून त्याच्या व्रात्यपणाचें आचरण जसें इकडे होई तसेंच राज्यकारभारांतही होत असे. एके वेळीं मद्यप्राशनाच्या लहरींत ही स्वारी आपल्या चार मित्रमंडळींत गप्पा गोष्टी सांगत रंगांत आली असतां कांहीं राजकारणासाठीं दिवाण गंगाधरपंत तेथें आला, तेव्हां त्यानें आपल्या रंगाचा बेरंग केला असें समजून या होळकर कुलांगारानें रागास चढून

त्याच्या पाठीवर सपासप छड्या मारिल्या. तसेंच त्याच्या हातून व्रात्यपणाचीं कृत्यें घडल्याबद्दल तुकोजीरावानें त्यास दोष दिला असतां त्यानें त्यास आपल्या हुजऱ्याकडून गचांडी मारवून वाड्याबाहेर घालवून दिलें व पुनः कधीं वाड्यांत न येण्याविषयीं सक्त ताकीद केली. अशा त्याच्या वेडेपणाच्या अनेक गोष्टी नित्य घडून येत. एकदा तो लहरींत आला ह्मणजे कोणास कामगिरीवांचून बक्षीस आणि अपराधावांचून शिक्षा देत असे. सारांश, भागवतांत प्राचीन काळीं झालेल्या वेन राजाचें जसें वर्णन केलें आहे तद्वतच मालीरावाची सर्व कृत्यें होत असत. या त्याच्या दुष्टपणाच्या सर्व कृत्यांचा परिणाम तो होळकराची गादी चालविण्यास अगदीं नालायक आहे असें ठरून सर्व लोकांस अत्यंत त्रास झाला. तथापि साध्वी अहल्याबाईकडे पाहून व तिची आपल्या लोकांविषयीं असलेली कळकळ लक्षांत आणून बरेच दिवसपर्यंत लोकांनीं त्याचा ताप निमूटपणें सहन केला.

पण नासलेलें फळ जसें फार वेळ झाडास चिकटून रहात नाहीं, त्याप्रमाणेंच या बिघडलेल्या पोराची त्रासदायक कारकीर्द फार दिवस होळकरांच्या प्रजेस भोगावी लागली नाहीं. मल्हाररावांच्या मागें एक वर्षाच्या आंतच कांहीं आकस्मिक कारण घडून मालीरावाचा अंत झाला. आणि त्यामुळें त्याच्या दुर्वर्तनानें पुढें होळकरांच्या राज्यांत होणारा अनर्थ टळला.

मालीरावाचा जो आकस्मिक अंत झाला त्यासंबंधानें अशी वार्ता प्रसिद्ध झाली कीं, सच्छील ब्राह्मणांचा छल करणाऱ्या आ-

पल्या पुत्राच्या दुर्वर्तनास त्रासून अहल्याबाईनेंच कांहीं प्रयोग करवून त्याचा अंत घडवून आणिला. ही वार्ता त्या वेळीं सर्व हिंदु व परकीय लोकांस खरी वाटली व अद्यापि बहुतेकांचा इजवरच विश्वास आहे. आतां सकृद्दर्शनीं ही बातमी ऐकून ऐकणारांच्या मनांत ' जिनें धर्मासाठीं प्रत्यक्ष आपल्या पोटच्या मुलाचा प्राण घेतला तिची योग्यता खचित फार मोठी आहे,' असे विचार येऊन ते तिची वाहवा करतील. आणि खुद्द साध्वी अहल्याबाईच्या नित्याचरणाकडे लक्षपूर्वक पाहिलें तर, तिचा पुत्र वेडेपणाच्या लहरींत जीं भयंकर कृत्यें करी तीं पाहून तिला फार संताप येई व हा पुनः कधीं शुद्धीवर येण्याची आशा नव्हती ह्मणून तिलाअत्यंत दुःख वाटे. तेव्हां आपल्या नांवलैकिकाकरितां, आपल्या राज्याकरितां, सर्व लोक.करितां, फार काय सांगावें, खुद्द वेडेपणामुळें झालेल्या त्याच्या भयंकर स्थितीकरितां तो मेला तर बरें, असें खचित तिला वाटलें असेल; तथापि स्वधर्मांत सांगितलेलें यत्किंचितही पातक करण्यास जी महासाध्वी कधीं प्रवृत्त झाली नाहीं, ती पुत्रहत्येचें भयंकर पातक आपल्या माथीं मारून घेण्यास तयार होईल अशी आमची कल्पना धांवत नाहीं. या मरणासंबंधानें मुंबईचे माजी गव्हरनर सरजॉन् मालकमसाहेब यांनीं फार बारिक रीतीनें चौकशी करून जी हकीकत आपल्या पुस्तकांत दाखल केली आहे तीच खरोखरी घडलेली असावी असें आह्मांस वाटतें. मालीरावाच्या तैनातीस अनेक दासी होत्या, त्यांतील एका सुस्वरूप व तरुण दासीबरोबर इंदूरशहरांतला कोणी जडिबुट्टी करणारा दोस्ती ठेवितो असें त्यास कोणी वर्तमान सांगितलें, आणखी शिवाय असेंही कळविलें

कीं, तो मनुष्य मोठा मांत्रिक आहे. मालीरावास तें कळतांक्षणीं अत्यंत कोप चढला, व लागलेच शिपायांकडून त्याला पकडून आणवून कांहीं विचार न करितां एकदम ठार मारविलें. मारतेवेळीं तो जडिबुट्टीवाला त्यास बजावून ह्मणाला कीं, मला निरपराध्याला मारीत आहेस, पण विचार कर, मी समंध होऊन तुझ्या उरावर बसेन, आणि याचा सूड घेईन. अविचारी मालीरावापुढें या त्याच्या भाषणाचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

पुढें कांहीं दिवसांनीं या गोष्टीची चौकशी होतां होतां तो खरोखरच निरपराधी होता अशी मालीरावाची खातरी झाली. मग त्याचे अंतकाळचे शब्द त्याला आठवले व आधींच तो वेडा झाला असल्यामुळें, तो समंध होऊन आतां माझा सूड घेणार अशी त्याला दहशत बसली. मग काय विचारावयाचें आहे ! त्याचेच शब्द हा अहोरात्र घोकूं लागला, व सारे लोक तो अन्यायानें मारिलेला जडीबुट्टीवाला समंध होऊन त्याला लागला आहे असें ह्मणूं लागले.

ही दुःखकारक बातमी ऐकून साध्वी अहल्याबाईला किती दुःख झालें असेल बरें ? भूत, पिशाच, समंध, यांवर तिचा पूर्ण विश्वास असल्यामुळें लोकांनीं सांगितलेलें खरें असावें अशी तिची खातरी झाली. व त्याचा प्रतिकार करण्याकरितां ती दुसरे मांत्रिक व देवऋषि यांचा शोध करूं लागली. द्रव्यलोभानें पुष्कळ मांत्रिक, देवऋषि आले, व त्यांनीं आपणास वाटले ते उपाय केलें, पण त्याचा उपयोग

कसा व्हावा? 'पिशाचाच्या हातीं कोलती' या ह्मणी-प्रमाणें त्यामुळें मालीराव अधिकच दहशत घेऊन दुखण्यानें पडला व अहोरात्र वाटेल ते बहकूं लागला. त्याची ती दुःस्थिति पाहून साध्वी अहल्याबाईच्या दुःखास पारावार नाहीं-सा झाला. रडून रडून तिच्या डोळ्यांतलें सर्व पाणी आटून ते कोरडे पडले. ती नित्य देवाची प्रार्थना करी कीं, देवा, ही पुत्राची स्थिती बघण्यापेक्षां मला मरण दे. मालीराव लह-रींत येऊन त्या बुट्टीवाल्याच्या तोंडचें शब्द बोलूं लागला ह्मणजे त्याच्या अंगांत समंध आला असें समजून ती त्याची हात जोडून प्रार्थना करीत असे, व त्याला ह्मणे कीं, तूं कृपा करून माझ्या मुलाला सोड. मी तुला एक मोठें देऊळ बांधून देतें व मागशील तितकी जमीन इनाम करून देतें. पण तें त्यानें ऐकिलें नाहीं. तो ह्मणे कीं, यानें मला अपराधावांचून मारिलें आहे तर मी याचा जीव घेईन. अखेरीस त्या साध्वीचे सर्व उपाय निष्फळ होऊन त्या संबंधानें ह्मणा कीं, तिच्या दुर्दैवानें ह्मणा, तिच्या त्या एकुलत्या पुत्राचा शेवट झाला व त्याच्या स्त्रीनें त्याबरोबर सहगमन केलें!

हा अनिवार्य अनर्थ घडून आला तेव्हां त्या माउलीची स्थिति दुःखानें व ममतेनें कशी झाली असेल हें सांगितलें पाहिजे काय? पुत्र शूर, शहाणा व सदाचारी असो, अथवा गचाळ, मूर्ख व दुराचारी असो, तो कीर्ति मिळवो कीं, अपकीर्ति मिळवो, कसें असलें तरी मातेचें जन्मापासून मरेपर्यंत त्यावर निष्कृत्रिम प्रेम असतें. सर्व सुखांचा दाता जो पति तो ऐन तारुण्यांच्या भरांत गेला. पुढें सासू-

सासऱ्यांच्या आश्रयाखालीं कांहीं समाधानानें दिवस काढले न काढले तों तेही सोडून गेले. आणि नंतर ज्याचें लालन-पालन करून लहानाचें मोठें केलें व जो आपल्या पित्याचें व कुळाचें नांव राखून मला सुख देईल असें वाटलें होतें तो पुत्रही आतां सोडून गेला. इतकेंच नाहीं, तर ज्यांनीं अनेक सायासांनीं ही होळकराची गादी स्थापिली त्या मल्हाररावांचा आज निर्वंश झाला; आणि या सर्वांस कारण माझें दुर्दैव ! असें वारंवार तिला वाटून ती शोकाकूल झाली.

साध्वी अहल्येचा पुत्रशोक फारच अनिवार्य व हृदयद्रावक आहे. पण तो आह्मांस वर्णन करतां येत नाहीं; कारण निरनिराळ्या दुःखप्रसंगांचें नवें नवें वर्णन देण्यास आमच्या भाषेंत आतां शब्दच राहिले नाहींत. राहून राहून परमेश्वराच्या अथवा तिच्या दुर्दैवाच्या कृतीचें मोठें नवल वाटतें कीं, कायावाचामनेंकरून परोपकारार्थ झटण्यास जी महासाध्वी अवतीर्ण झाली तिला आईबाप, पति, सासूसासरे आणि पुत्र या सर्वांच्या सहवाससुखापैकीं एकही सुख फार वेळ मिळूं नये अं ! अथवा पुढें तिची दिगंत कीर्ति करण्याचा ज्या प्रभूचा हेतु होता त्यानें तिच्या सद्गुणांची पुरी खातरी करून घेण्याचें मनांत योजिलें असेल; कारण अनेक भट्यांतून यत्किंचितही डाग न लागतां जें सोनें बाहेर पडतें तेंच शुद्ध सोनें होय. त्याप्रमाणें अनेक भयंकर दुःखांतून धैर्यानें पार पडून जो आपले सद्गुण प्रकट करतो तोच मनुष्य परमेश्वराच्या कृपेस पात्र होतो. आमच्या चरित्रनायिकेची स्थिति अशीच झाली असेल. असो. यावरून आपणास इतकाच बोध घ्यावयाचा कीं, जिच्यासारखी सर्व

जगतितलावर एक देखील उदार स्त्री झाली असेल कीं नाहीं याची शंका आहे, तिला जर इतकीं दुःखें भोगावीं लागलीं व तिनें ती सर्व भोगून जर परमेश्वराविषयींच्या आपल्या पूज्य बुद्धींत कमी पडूं दिलें नाहीं, तर एकादें क्षुल्लकसें पुण्यकर्म करतांच तत्काल त्याचें फल न मिळाल्यास त्या जगन्नियंत्यास अन्यायी ह्मणण्यास आपण तयार होतों तें आपणास योग्य आहे काय ?

भाग सातवा समाप्त.

# भाग ८ वा.

## श्रीमंत दादासाहेब पेशवे.

:o:

श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं एका ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं, 'जगीं सर्व सूखी असा कोण आहे.' या ह्मणीचा तात्पर्यार्थ इतकाच घ्यावयाचा कीं, या जगांत सर्व गोष्टींनीं सुख कोणासही मिळावयाचें नाहीं, असा ईश्वरी संकेत आहे. नाहीं तर जो एक यःकश्चित् धनगर एका मोठ्या संस्थानाचा अधिपति झाला, ज्यास कोणी कधीं पुसतही नव्हतें तो श्रीमंत पेशवे सरकारचें केवळ विश्वासस्थान बनला व जो हातांतली गुरें राखण्याची काठी झुगारून देऊन सकल वीरांचा नायक झाला, त्या मल्हाररावाच्या एकुलत्याएक पुत्राचा व नातवाचा अल्पवयांत अंत होऊन त्याच्यावर, पिंड मिळण्याविषयीं दुसऱ्याच्या तोंडाकडे स्वर्गलोकीं बसून पाहण्याची पाळी यावी, यापरती अधिक दुःखकारक स्थिति ती कोणती? पण इतक्यानेंच निभावून इहलोकीं तरी त्यानें संपादन केलेलें राज्य आमच्या चरित्रनायिकेसारख्या धैर्यवान् व पुण्यवान् स्त्रीच्या हातीं ठेवून त्याची वाताहत झाली नाहीं ही परमेश्वराची मोठीच कृपा समजली पाहिजे. खचित या वेळीं आपल्या सासऱ्याचा अभिमान बाळगणारी अहल्याबाई नसती तर त्या वेळेसच होळकरांच्या राज्याची समाप्ति होऊन आजमित्तीस त्याच्या

पराक्रमाची कीर्ति मात्र अवशिष्ट राहिली असती असें आह्मांस वाटतें. हें आमचें अनुमान खरें आहे कीं चुकीचें आहे याचा पुढील हकीकतीवरून वाचकांस निर्णय करितां येईल.

मालीराव होळकर मरण पावल्यावर मल्हाररावांच्या गादीस कोणी योग्य वारस न राहिल्यामुळें अहल्याबाईस व त्यांच्या पदरच्या सर्व सरदारांस आतां राज्याची व्यवस्था कशी करावी अशी मोठी पंचाईत पडली. कारण, मालीराव तिला एकटाच मुलगा होता तो वारला. बाकी राहिलेली कन्या मुक्ताबाई; पण हिंदुधर्मांतील राज्यपद्धतीप्रमाणें तिला कोणत्याही प्रकारें राज्याचें आधिपत्य प्राप्त होणें बेकायदेशीर होतें. अशा वेळीं दिवाण गंगाधर यशवंत यानें अहल्याबाईला अशी मसलत दिली कीं, माळव्यांत श्रीमंत रघुनाथराव पेशवे फौजेसुद्धां येऊन राहिले आहेत, तर त्यांस मोठा लांच देऊन त्यांकडून एखादे नातलगाचा लहान मुलगा दत्तक घ्यावा व त्याच्या नांवानें राज्य चालवावें. त्यानें आणखी असेंही सांगितलें कीं, तुह्मी जरी मोठ्या कर्त्या आहां तरी जातीनें स्त्री असल्यामुळें राज्यकारभार चालविण्यास व लोकांवर दरारा बसविण्यास अयोग्य आहां; यासाठीं सदर्हूप्रमाणें व्यवस्था करून आपल्या खाजगी खर्चाकरितां बऱ्याच मोठ्या उत्पन्नाचा एकादा परगणा तोडून घेऊन दानधर्मांत आयुष्य घालवीत खुशाल महेश्वरीं जाऊन स्वस्थ बसा.

दिवाण गंगाधर यशवंतानें अहल्याबाईला जी ही मसलत दिली त्यांत त्याचा असा हेतु होता कीं, ही बाई राज्यकारभा-

रांतून आपलें अंग काढून स्वस्थ बसली व गादीवर नामधारी एखादें पोर बसलें ह्मणजे आपली दिवाणगिरी कायम राहून राज्याची सर्व व्यवस्था आपल्या इच्छेप्रमाणें करितां येईल. हा त्याचा उद्देश त्याच्या हिताचा होता; पण तो कबूल करण्याइतकी आमची चरित्रनायिका मूर्ख नव्हती. तिला तो मुळींच पसंत पडला नाहीं; आणि तशांत लांच देऊन आपल्या गादीला वारस करून घेणें हें आपल्या कुलास लांछनास्पद आहे असें तिला वाटून तिनें गंगाधर यशवंत यास साफ सांगितलें कीं, माझा मुलगा मेला तेव्हांच होळकरांचा वंश खुंटला. आतां त्याच्या योग्य वारसांपैकीं एकाची मी बायको व दुसऱ्याची आई आहें, तर या नात्यानें पुढची व्यवस्था वाटेल तशी करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे; त्या कामांत मी दुसऱ्याला कधीं हात घालूं देणार नाहीं, व दत्तक घेण्यासाठीं लांच देणें मी कधीं कबूल करणार नाहीं. इतकें बोलून ती आणखी ह्मणाली कीं, एकादा अल्पवयस्क मुलगा मी दत्तक घेऊन तो गादीवर बसविला तर त्याच्या हातून राज्यकारभार कसा होणार व लोकांवर त्याची जरब तरी कशी बसणार ? यासाठीं सुभेदारांनीं मरणसमयीं माझ्या मुलाचा हात तुकोजीच्या हातांत घालून त्याला त्याचें रक्षण करण्यास व आपले वंशाचें नांव राखण्यास सांगितलें होतें, हें लक्षांत आणलें तर गादीचा मालक त्यास करण्याविषयीं त्यांची मला आज्ञा आहे व त्याप्रमाणें तोच मालक होणें मलाही पसंत आहे. आपल्या दिवाणाशीं अहल्याबाईनें याप्रमाणें भाषण केलें व तुकोजीच्या नांवाची द्वाही फिरवून राज्यकारभार करण्याविषयीं त्यास आज्ञा केली.

एकादें अज्ञान पोर दत्तक घेऊन बाहुल्यासारखें गादीवर बसवून

राज्य चालविण्यापेक्षां आपलाचजवळचा आप्त आपल्या सासऱ्याच्या विश्वासांतला व आपल्याच पराक्रमानें नांवारूपास आलेला असा तुकोजी अहल्याबाईनें होळकरांच्या गादीस अधिकारी नेमिला तो कोणा सुज्ञ मनुष्यास योग्य वाटणार नाहीं ? पण महत्वाकांक्षेनें अंध झालेल्या गंगाधर तात्यास तो कसा पसंत पडणार ? तुकोजी गादीवर बसल्यावर आपल्या दिवाणगिरीवर पाणी सोडणें भाग पडेल कीं काय अशी त्याला भीति पडली. नंतर त्यानें असा विचार केला कीं, अहल्याबाई ही जात्या स्त्री आहे. हिचें धैर्य तें किती असणार ? तर अगोदर रघुनाथरावांसच अनुकूल करून घेऊन त्यांस येथें आणावें व त्यांजकडून हिला जरब घालून आपण सांगूं तसें कबूल करण्यास लावावें. लोभी गंगाधर यशवंताचा हा विचार कायम होऊन त्यानें त्याप्रमाणें लागलाच माळव्यांत दादासाहेब होते त्यांकडे खलिता लिहून पाठविला कीं, मालीरावाच्या मरणानें मल्हाररावांची सर्व दौलत बेवारसी झाली आहे व येथील सर्व प्रजाजन शोकनिमग्न झाले आहेत. तशांत आपणास सुभेदारांच्या चिरंजीवाप्रमाणेंच लोक समजतात तर हल्लींच्याप्रसंगीं येथें येऊन सर्व राज्य आपल्या ताब्यांत घेण्याचें करावें. वेळेवर याल तर सर्व कांहीं होईल.

सदरहु खलिता गंगाधर यशवंताच्या गुप्त सेवकाहातीं श्रीमंत रघुनारावपेशवे ऊर्फ राघोबादादा यांस मिळाला. यावेळीं या शूर पुरुषाच्या पूर्वीच्या व आतांच्या प्रकृतींत महदंतर पडलेलें होतें. पूर्वीं आपला भाऊ पेशवाईच्या गादीवर असतांना ज्यानें लक्ष्मणासारखें बंधुप्रेम मनांत ठेवून वारंवार त्याच्या शत्रूंशीं लढाया मारल्या व त्यांना जेरीस आणून त्याच्या

राज्याची व अधिकाराची वृद्धि केली व स्वतः आपण ऐश्वर्यलोभापासून दूर राहिला तोच हा राघोबादादा यावेळीं आपल्या सुंदर, पण दुष्ट स्त्रीच्या कपटजालांत सांपडून आपल्या शौर्यास व भ्रातृप्रेमास कलंक लावण्यास, तसेंच कुटुंबांतील माणसांशीं वैर जोडण्यास व आपल्या एकनिष्ठ सरदारांचा पाडाव करण्याकरितां पुढें परकीय लोकांस घरांत आणून त्यांकडून आपल्या वडिलांनीं अविश्रांत पाणी घालून वाढविलेल्या पेशवाईरूप वृक्षाचा उच्छेद करण्यास कारण झाला ! त्याच्या स्त्रीनें पेशवाईचा अर्धा वांटा आपणास असावा असें त्याच्या पुरें मनांत भरवून दिल्यावरून तो या वेळीं गादीवर असलेला आपला पुतण्या माधवराव याशीं द्रोह करूं लागला होता व एके वेळीं त्याचा शत्रु निजाम याच्या सहायानें त्याशीं लढाईसही आला होता; पण त्या शूर व चतुर माधवरावानें त्याचा लागलाच पराभव करून टाकिल्यामुळें तो तेथून निघून राज्यप्राप्तीच्या लोभानें उत्तरहिंदुस्थानांत आला. राघोबाची ही हकीकत या चरित्रांत अप्रासंगिक आहे, तरी त्याची पुढील कृति वांचून वांचकांस विस्मय न वाटावा ह्मणून ती आह्मांस देणें भाग पडलें. दिवाण गंगाधर यशवंताचा खलिता वाचतांच राघोबादादास परमानंद होऊन तो होळकराचें राज्य बुडविण्यास तयार झाला व त्या आशयाचें त्यानें दिवाणास उत्तर पाठविलें.

या जगांत दैवाच्या दुर्विलासाचे बारंवार होणारे जे खेळ पाहण्यांत येतात त्यांचा नियमच असा असतो कीं, एकदा संकटें आलीं ह्मणजे तीं एकामागून एक सारखीं येतात. त्या वेळीं आपणावर जे प्रेम करणारे असतात ते वैरी होतात, व ज्यावर

आपण उपकार केलेले असतात ते कृतघ्न होतात. अहल्याबाई ह्मटली ह्मणजे एका गरीब धनगराची कन्या तिचें खंडेरावाशीं लग्न करून तिचा भाग्योदय करण्यास जो अंशतः तरी कारणीभूत झाला त्या राघोबानें पतीच्या, सासऱ्याच्या व पुत्राच्या निधनांनीं दुःखांत पडलेल्या त्या अनाथ अबलेस सहाय करावयाचें तें सोडून तिला कोंपऱ्यांत बसवून सर्वस्वी नागविण्याचा विचार करावा काय? तसेंच ज्यांच्या कृपेनें दिवाण गंगाधर यशवंत एवढ्या महत्पदास पोंचला त्या मल्हाररावांच्या स्नुषेशीं त्यानें असा कृतघ्नपणा करावा काय? धिक्कार असो त्यांच्या ह्या नीच विचारास!

राघोबादादाची ही नीच मसलत अहल्याबाईच्या अगोदर तिच्या नणंदा हरकुबाई व उदाबाई यांस कळली व लागलीच त्यांनीं ती अहल्याबाईला कळवून सांगितलें 'आतां सावध रहा. ब्राह्मण हरामखोरीस आला आहे; वेळेवर उपाय केल्यास ठीक पडेल, नाहींतर तुला घोड्याचे दाणे भरडावे लागतील व आह्मांस भीक मागावी लागेल.' ही बातमी अहल्याबाईला कळतांच तिच्या सर्वांगाची लाही झाली. व आतां काय करावें असा तिला विचार पडला; पण ती पुऱ्या दृढनिश्चयाची स्त्री होती. कांहीं झालें तरी प्राण जाईपर्यंत आपणाकडून हार घ्यावयाची नाहीं असा संकल्प करून शिवबा बाजी व राजाराम आत्माजी या दोघांस बोलावून आणवून त्यांना ती रागानें ह्मणाली 'ब्राह्मणानें मेल्यानें हरामखोरी आरंभली आहे, तरी ह्मणावें मी बायकोमाणूस आहें असें समजू नका. खांद्यावर बासडा टाकून लढाईला उभी राहिलें ह्मणजे श्रीमंतांच्या दौलतीस अवघड पडेल. आमचे वडीलांनीं माडभवई करून राज्य मिळविलें

नाहीं तर आपलें शरीर तरवारीला खर्ची घातलें आहे. आह्मी आपले ताबेदार. वडिलांप्रमाणें चाकरी घेतल्यास हजर राहूं आणि धुणींपाणी सरलीं असल्यास मोंगलांचीं करूं अथवा फिरंग्यांची करूं अथवा काय पाहिजे तें करूं, पण ब्राह्मणास दौलतीचा अभिलाष करूं देणार नाहीं.' इतकें बोलून त्या दोघांस भोंसले, गायकवाड वगैरे मल्हाररावांचे जे दोस्त राजे होते त्यांस सांडणीस्वाराबरोबर अशा आशयाचीं पत्रें पाठविण्यास सांगितलें कीं, कैलासवासी सुभेदार यांनीं श्रीमंतांचे दौलतीचा पाया खोदून आपल्या हातानें वीट टाकून वर इमारत उभारली हें तुह्मांस माहित आहेच. त्यांच्या पश्चात् आह्मी दुःखांत चूर झालेलों असतां आमची दौलत रक्षण करून आह्मांकडून सेवांचाकरी करवून घेण्याचें एकीकडे ठेवून उलट आमच्या दौलतीविषयीं अभिलाष धरिला आहे तर आमच्या मदतीस सर्वांनीं फौज पाठवावी. नाहींपेक्षां आमच्या प्रारब्धीं असेल तसें भोगूं; पण आज आह्मांवर प्रसंग आला तो उद्यां तुह्मांवर येण्यास चुकणार नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवावें. इतकें सांगून व सर्व मसलत गुप्त ठेवण्याविषयीं बजावून त्यास जाण्याविषयीं आज्ञा दिली.

मालीरावाच्या मरणाच्या अगोदरपासून तुकोजी होळकर हा उदेपुरांत कांहीं राजकारस्थानांत गुंतलेला होता व तो अद्यापि तिकडेच होता. त्याचे या वेळीं येथें येणें अवश्य आहे असें अहल्याबाईस वाटून तिनें ताबडतोब सांडणीस्वाराच्या हातीं सर्व मजकुराचें पत्र त्यास पाठवून त्यांत फौजेसह जेवीत असल्यास पाणी प्यावयास इकडे यावें असें लिहिलें.

आपण योजिलेली कपटाची मसलत सिद्धीस न जातां भलत्याच

थरावर गेली असें पाहून व आतां येथें राहिल्यास धडगत नाहीं असा विचार करून दिवाण गंगाधर यशवंत यानें इंदुरांतून पाय काढिला व तो राघोबादादास जाऊन मिळाला.

यानंतर घडलेल्या सर्व हकीकतींचें पत्र अहल्याबाईनें एका सरदाराच्या हातीं त्या वेळीं गादीवर विराजमान असलेले श्रीमंत माधवराव पेशवे यांस पाठवून त्यांस न्याय देण्याविषयीं विनंति केली. त्यांची स्त्री रमाबाई मोठी सज्जन व उदार स्वभावाची आहे अशी तिची कीर्ति अहल्याबाईच्या कानावर गेलेली होती. साधारणतः पुरुषांपेक्षां स्त्रियांपाशीं स्त्रियांची दाद लवकर लागते, कारण समजातीयांकडे परस्परांचा विशेष ओढा असतो, ह्मणून आमच्या चरित्रनायिकेनें कांहीं मौल्यवान् मोतीं व उत्तर हिंदुस्थानांत होणाऱ्या कांहीं उंची उंची वस्तू एका विश्वासूक दासीजवळ देऊन तिला आपल्या कार्यासाठीं पुण्यास रमाबाईकडे पाठविलें, व आपल्यावर आलेल्या प्रसंगाबद्दल खालील आशयाचें पत्र तिजजवळ देऊन तें तिला देण्यास सांगितलें.

"श्रीमंत सौभाग्यवंती भाग्यशालिनी रमाबाईसाहेब यांस—आपणांस प्राप्त झालेलें ऐश्वर्य अखंडित राहण्याविषयीं श्रीजगदंबेची प्रार्थना करून चरणापाशीं ही आपली आश्रित अनाथ स्त्री विनंति करीत आहे ती बाईसाहेब मान्य करतील अशी आशा आहे. श्रीमंतांच्याच कृपेनें सुभेदारांनीं ऐश्वर्य संपादन केलें व तें त्यांच्या घराण्यास निरंतर राहून त्यांचे नांव चिरकाल रहावें अशी पूर्वीच्या दोघां थोरल्या सरकारांची इच्छा होती असें असतां

श्रीमंत दादासाहेब आमच्या हरामखोर दिवाणाच्या मसलतीला लागून या गरीब अबलेला कोंपऱ्यांत बसवूं पहातात, तर तसें त्यांस न करण्याविषयीं धाकट्या श्रीमंताकडून सांगवून या पदरच्या स्त्रीची अब्रू आणि भाकरी निरंतर चालेल अशी बाईसाहेब तजवीज करतील तर तिजवर होणारे उपकार कधींही फिटले जाणार नाहींत.

आपली अनाथ झालेली

आश्रित

अहल्या. "

ठरल्याप्रमाणें रघुनाथरावांची स्वारी सैन्यासुद्धां इंदुरापासून बारा कोसांच्या अंतरावर येऊन थडकली. हें वर्तमान अहल्याबाईस कळतांच तिनें आपलें धैर्य किंचितही कमी होऊं न देतां आपल्या पदरच्या लोकांस व सैन्यास आज्ञा केली कीं, तुमची सर्व तयारी असूं द्या व माझ्या लाडक्या हत्तीवर हौद्याच्या चारी कोंनास तिरांनीं भरलेले भाते बांधा. त्या हरामखोर पेशव्याशीं मी जातीनें लढून त्यास मल्हाररावांच्या सुनेची करामत दाखविणार आहें. खरोखरच आमच्या चरित्रनायिकेनें या वेळीं आपल्या सैन्यास उत्तेजन देऊन स्वतः युद्ध करण्याचा विचार केला होता. जात्या स्त्री असून जन्मापासून युद्धकलेचें किंचित् देखील शिक्षण नसतां राघोबादादासारख्या शूर सरदाराशीं लढाई करण्यास ती तयार होते ही किती विलक्षण गोष्ट आहे ! पण अशी विलक्षण गोष्ट तिजकडून घडली

आहे ह्मणूनच जगांत ती अलौकिक ठरून तिची सर्वतोमुखीं प्रशंसा होत आहे.

अहल्याबाईचें आपल्या नौकरचाकरांशीं कसें वर्तन होतें हें मागें सांगण्यांत आलेंच आहे; त्याच प्रकारचें तिचें वर्तन तिच्या सैन्यांतील लोकांशीं असे. मल्हाररावांच्या मरणानंतर त्यांना अनेक वेळां बक्षिसें देऊन व त्यांच्या शौर्याची तारीफ करून तिनें त्यांस संतुष्ट ठेविलें होतें; त्यामुळें तिचा हुकूम होतांच ते सर्व लढाईला तयार झाले. तशांत आपली धनीण जातीनें युद्ध करण्यास येणार असें समजतांच तर त्यांना विशेष आनंद होऊन मरेपर्यंत युद्धांत तिला आपली कर्तबगारी दाखविण्याचा त्यांनीं उत्साह प्रकट केला.

याप्रमाणें आपली लढाईची सर्व तयारी केल्यावर तिनें राघोबादादांस असा निरोप सांगून पाठविला कीं, तुह्मी अन्यायाच्या मसलतीस अनुकूल होऊन स्त्रीवर चालून येत आहां हें कांहीं चांगलें करीत नाहीं. मी तर बोलून चालून स्त्री आहें. आपणासारख्या रणधुरंधरांनीं लढाईत माझा पराजय केला तरी त्यांत आपली कीर्ति वाढेल असें समजूं नका; पण यदाकदाचित् दुर्दैवानें माझ्या हातून तुमचा पराजय झाला तर या जगांत कोणास तोंड दाखविण्यास आपणास जागा राहाणार नाहीं, या गोष्टीचा पुरता विचार करून काय करणें तें करा.

अहल्याबाईनें पाठविलेला सांडणीस्वार उदेपुरास जाऊन पोंचतांच तिनें दिलेलें पत्र त्यानें तुकोजीरावास दिलें. तें वाचतांक्षणींच

तिच्या आज्ञेप्रमाणें तो रात्रीचा दिवस करून सहावे रोजीं फौजेसुद्धां इंदुरास येऊन दाखल झाला. तो येतांच अहल्याबाईस परमानंद होऊन मुहूर्त वगैरे कांहीं एक न पाहतां तिनें त्याच दिवशीं त्यास अभ्यंग स्नान घालून होळकराच्या गादीचीं वस्त्रें दिलीं, व तो मल्हारराव होळकरांच्या राज्याचा अधिपति ह्मणून सर्वत्र द्वाही फिरविली.

इतक्यांत भोंसले व गायकवाड यांची वीस हजार फौज अहल्याबाईच्या सहायार्थ नर्मदातीरीं येऊन दाखल झाल्याचें वर्तमान सांडणीस्वारानें येऊन सांगितलें, व वरकड राजेरजवाड्यांकडून निरोप आले कीं, सुभेदारांचा ज्यावर उपकार नाहीं असा कोण आहे ? तुमचे प्रसंगास आम्ही जवळच आहों असें समजावें. हें वर्तमान ऐकून आपणास खचित या कार्यांत दैव अनुकूल होणार अशी अहल्याबाईची खातरी झाली.

अहल्याबाईनें पाठविलेला निरोप राघोबादादांस पोंचला; पण राज्यलोभामुळें ज्याचें अंतःकरण विचारशून्य झालें त्यावर त्याचा काय परिणाम होणार ? त्याचा लढाई करण्याचाच निश्चय कायम होऊन तो क्षिप्रातीरीं फौजेसुद्धां येऊन थडकला.

आतां लढाई खास द्यावी लागणार असें समजून तुकोजीनें अहल्याईच्या पायांवर डोकें ठेवून लढाईस जाण्याची परवानगी मागितली व तिचा आशीर्वाद घेऊन तो स्वतःचें व मदतीस आलेलें सर्व सैन्य बरोबर घेऊन निघाला, आणि त्यानें राघोबास सांडणीस्वार पाठवून कळविलें कीं, तुह्मी क्षिप्रा उतरल्यास

तुमच्या आमच्या तलवारींची खडाजंगी उडेल याचा पुरा विचार करून पुढें पाऊल टाकावें.

इतक्या निकरावर मजल येऊन ठेपेपर्यंत दादासाहेबांकडची सर्व व्यवस्था ठीक होती; पण हा निष्कारण आपआपसांत रक्तपात होणार असें या वेळीं त्यांच्या शिंदे वगैरे सरदारांच्या मनांत येऊन त्यांनीं लढाई सुरु करण्यास आपली नाखुषी दाखविली, व होळकरांचें स्वातंत्र्य नष्ट करण्यास तयार झालेल्या गंगाधर तात्यास त्याच्या कृतघ्नतेबद्दल व त्यास सहाय करणाऱ्या राघोबास त्याच्या अन्यायाबद्दल उघड दोष देऊन ते ह्मणाले कीं, अशा नीच कृत्याबद्दल आह्मी साध्वी अहल्याबाईवर कधीं शस्त्र धरणार नाहीं.

राघोबाच्या सैन्यांत अशी फाटाफूट होते आहे अशा वेळीं अहल्याबाईनें माधवरावाकडे जो निरोप पाठविला होता त्याचा निकाल लागला. श्रीमंत माधवराव हे मोठे न्यायी व आपल्या सरदारांविषयीं पूर्णाभिमानी असल्यामुळें होळकरांच्या गादीची वाटेल त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास अहल्याबाईस पूर्ण अधिकार असणें हेंच न्याय्य असें त्यांस वाटलें, व या त्यांच्या विचारास आमच्या चरित्रनायिकेनें रमाबाईकडे जो वशिला लाविला होता त्याचे पाठबळ मिळून जोर आला. रमाबाई ही खरोखरच मोठी उदार अंतःकरणाची स्त्री होती, आणि तशांत ती महापतिव्रता असल्यामुळें श्रीमंत पेशवे हे तिच्या अगदीं अर्ध्या वचनांत वागत असत. तिला आपल्या पदरच्या एका साध्वी स्त्रीवर अन्यायानें होत असलेल्या जुलमाबद्दल फार

वाईट वाटून तिची पतीपाशीं दाद लागण्याकरितां होईल तितका प्रयत्न करण्याचा तिचा निश्चय झाला व ती गोष्ट तिनें आपल्या पतीस कळविली. मग काय, अगोदरच श्रीमंतांचा जो बेत ठरला होता त्यास स्त्रीचेंही अनुमोदन मिळालें. तत्क्षणींच त्यांनीं सांडणी स्वाराबरोबर असा हुकूम पाठविला कीं, अहल्याबाई ही योग्य स्त्री असून तिला आपल्या सासऱ्याच्या व पतीच्या दौलतीची वाटेल तशी व्यवस्था करण्याचा पूर्ण अधिकार आहे. या तिच्या कृत्यांत जो आड येईल त्याचें योग्य पारिपत्य करण्यास आम्हांकडून तिला सहाय होईल. अहल्याबाईनें आपल्या राज्याची योग्य वाटेल तशी व्यवस्था करून आपले दोन वकील हुजुरांत पाठवावे. हा हुकूम वाचून अहल्याबाईला किती आनंद झाला असेल हें सांगावयास पाहिजे काय ? आपल्या राज्याच्या चिरस्थायित्वावर आलेलें अरिष्ट खुद्द पेशवेसरकारांनींच निवारण केलें म्हणून कृतज्ञतापूर्वक तिनें त्यांचे आभार मानिले व तेव्हांपासून दिवाण गंगाधरपंताचा आणि राघोबादादाचा पुरा नक्षा उतरविण्याचा तिचा दृढ निश्चय झाला.

इकडे आपले सर्व सरदार आपणास अनुकूल नाहींत असें दादासाहेबांच्या लक्षांत पूर्णपणें येऊन चुकलें. आतां लढाई आरंभिली तर तुकोजी प्राण जाईपर्यंत आपली शिकस्त करण्यास मागें घेणार नाहीं व जरी जय मिळाला तरी याकामास खूद्द माधवरावांचें अनुमोदन नसल्यामुळें आपला इच्छीत हेतु सफल न होतां मल्हाररावांच्या ऋणानुबंधांत अंतर पडून स्त्रीशीं युद्ध करण्याबद्दल अपयशाचा डाग मात्र लागेल. असा पोक्तपणाचा विचार करून केलेल्या कृत्याची योग्य संपादणी करण्याकरितां

त्यांनीं तुकोजीरावाकडे कारकून पाठवून त्यास विचारिलें कीं, मालीराव वारल्यामुळें आह्मी दुखवटा घेऊन बाईच्या समाचारास आलों असतां आपण वांकडी गोष्ट सांगतां हें काय ? दादासाहेबांच्या या म्हणण्यावर तुकोजीनें उत्तर पाठविलें कीं, जर आपण आमच्या समाचारास येत आहां तर फौज आणण्याचें कारण काय ? आपण पालखींत बसून यावें. ही फौज, राज्य व दौलत आपणांवांचून दुसऱ्या कोणाची आहे ? तुकोजीरावाकडून असा जबाब येतांच त्याच्या मनांत संशय न राहावा ह्मणून दादासाहेब लागलेच दहापांच शागीर्द मात्र बरोबर घेऊन पालखींत बसून तुकोजीरावाकडे आले. तेव्हां तुकोजीरावास आनंद होऊन तो त्यास सामोरा गेला. नंतर उभयतांची भेट होऊन तुकोजीनें दादासाहेबांच्या पायांवर डोकें ठेविलें. दोघेही श्रमी झाले. मग लागलेंच कुच करून दादासाहेबांसह तुकोजी इंदुरास आला. दादासाहेबांशीं सलोखा होऊन त्यांची भेट झाल्यामुळें अहल्याबाईस समाधान वाटलें. व विनाकारण रक्तपात न होऊं दिल्याबद्दल तिनें परमेश्वराचे आभार मानिले. नंतर आपल्या वाड्याशेजारींच दादासाहेबांचा डेरा देववून त्यांची तिनें उत्तम बरदास्त ठेवविली.

गंगाधर यशवंत यास आतां आपली मसलत आपल्याच अंगावर आली, व आपण सर्व जगांत कृतघ्न ठरलों असें पुरतेपणीं कळून आलें. मग त्याबद्दल त्यास पुरा पश्चात्ताप होऊन त्यानें भगवीं वस्त्रें धारण केलीं व सर्व ऐहिक व्यवहार सोडून देऊन विरक्त होत्साता तो खानदेशांत अणकाईच्या डोंगरावर जाऊन बसला. तो मुळचा चांगल्या स्वभा-

वाचा मनुष्य होता व ह्मणूनच सुभेदारांच्या हाताखालीं इतक्या योग्यतेस चढला होता. पण या वेळीं त्यास दुर्दैवानें घेरल्यामुळें तो विपरीत मसलत करून अहल्याबाई सारख्या साध्वीच्या प्रेमास व पुढें प्राप्त होणाऱ्या नांवलौकिकास सर्वस्वीं आंचवला! होळकर आणि श्रीमंत पेशवे या दोन्ही घराण्यांत होणाऱ्या कलहाचा सुदैवानें सामोपचारानें शेवट लागल्यावर अहल्याबाईच्या मदतीकरितां भोंसले, गायकवाड वगैरे सरदारांनीं आपलीं सैन्यें पाठविलीं होतीं ह्या त्यांच्या उपकाराबद्दल अहल्याबाईनें त्यांतील सर्व लोकांस मोठी मेजवानी देऊन त्यांच्या योग्यतेप्रमाणें कोणास कंठी, कोणास चौकडे, वगैरे बक्षीस देऊन त्यांचा योग्य गौरव केला व वेळेवर आपलीं मदत मला मिळाल्यानें माझा सर्वतोपरी बचाव झाला, मी आपली फार आभारी आहें अशी त्यांच्या सेनानायकांजवळ कृतज्ञता दर्शवून त्यांस जाण्यास परवानगी दिली. त्यांनींही स्वस्थानीं गेल्यावर बाईच्या उदार स्वभावाची व विलक्षण इभ्रतीची आपल्या यजमानांजवळ तारीफ केली.

श्रीमंत दादासाहेब पेशवे हे एकमास पर्यंत अहल्याबाईचे पाहुणे होऊन इंदुरास राहिले होते, तितक्या अवकाशांत त्यांनीं बारीक रीतीनें बाईविषयीं सर्व प्रजाजनांचें मत समजून घेण्याचा प्रयत्न केला; तेव्हां त्यांस पूर्णपणें कळून चुकलें कीं, सर्व प्रजा अहल्याबाईस केवळ देवाप्रमाणें मान देत आहे; यासाठीं तिजशीं वैर संपादन केलें असतां तिच्या तेजापुढें आपलें तेज पडणार नाहीं; इतकेंच नाहीं तर त्या योगानें सर्व लोकांचे शाप मात्र आपणास घेणें भाग पडेल. असा विचार करून तेथून त्यांनीं मुकाट्यानें पाय काढण्याचा विचार केला.

या वेळीं अहल्याबाई महेश्वरास होती. पुण्यास जाण्याविषयीं दादासाहेबांनीं तेथून तिचा निरोप मागविला असतां तिनें त्यांस महेश्वरीं येऊन आपणास भेटून जाण्याविषयीं विनंति केली; त्याप्रमाणें दादासाहेब महेश्वरीं गेल्यावर दोघांची सेव्यसेवकाच्या नात्यानें पुष्कळ वेळां बोलणीं झालीं.मग तेथें आठ दिवस मुक्काम करून ते दक्षिणेंत जाण्यास निघाले. नंतर तिनें एक पलटण बरोबर घेऊन पुण्यास जाऊन खुद्द श्रीमंत माधवराव पेशवे यांजकडून गादीचीं वस्त्रें घेण्याविषयीं तुकोजीस आज्ञा केली.

याप्रमाणें होळकरांच्या घराण्यावर जो अनिष्टकारक प्रसंग त्या वेळीं घडून यावयाचा होता तो टळून त्याचा शेवट असा गोड झाला हें पाहून कोणास आनंद होणार नाहीं ? पण असा आनंददायक परिणाम कां झाला बरें ? याचें मूळकारण पाहूं गेलें तर, आमच्या चरित्रनायिकेच्या अंगीं असलेले पातिव्रत्य, भूतदया,स्वाभिमान व प्रसंगावधान इत्यादि लोकोत्तर गुण हेंच होय असें कळून येईल; नाहीं तर अहल्याबाई ह्मणजे एक अनाथ स्त्री होती. राघोबादादास तिचा फडशा पाडण्यास किती वेळ लागला असता ? पण वरील सद्गुणांच्या जोरावर प्रथम केवळ परमेश्वरावर विश्वास ठेवून तिनें कंबर बांधिली व त्याच परमेश्वरानें तिला यश देऊन तिचे हेतु सफल केले. व दादासाहेबांचे कांहीं चालूं दिलें नाहीं. तात्पर्य, खऱ्या सद्गुणापुढें कसलें जरी शौर्य असलें तरी त्याचें तेज कधीं पडावयाचें नाहीं.

या वेळीं दुसरी एक विलक्षण गोष्ट घडलेली बखरींत सांगितली आहे ती आमच्या वाचकांकरितां आह्मी येथें उतरून

घेतों, ह्मणजे ती वाचून आमच्या चरित्रनायिकेच्या अंगीं वरील सर्वोत्तम सद्गुणांशिवाय प्रसंगोचित चातुर्यही होतें अशी खातरी झाल्यावांचून राहणार नाहीं. श्रीमंत दादासाहेब हे महेश्वरीं असतां अहल्याबाईनें आपला वर्तनक्रम पूर्वींप्रमाणेंच ठेविलेला होता. नित्य हजारों रुपये ती दानधर्मांत खर्च करीत असे, आणि त्याकरितां कोट्यावधि रुपये तिनें निराळे काढून ठेविलेले होते. त्या तिच्या द्रव्याचा श्रीमंत दादासाहेबांस अभिलाष उत्पन्न होऊन त्यापैकीं बरीच मोठी रक्कम त्यांणीं आपणांस हिंदुस्थानांत स्वारी करण्यास जाणें आहे तिच्या खर्चाकरितां उसनवार ह्मणून द्यावी असें अहल्याबाईपाशीं बोलणें लाविलें. पण त्यावर तिनें त्यांस चोख असें उत्तर दिलें कीं, ही माझी सर्व दौलत मी दानधर्माकडे योजून तीवर तुळशीपत्र व पाणी सोडून निराळी ठेविली आहे. आपली इच्छा असल्यास आपण दक्षिणा घेण्यास तयार व्हावें, ह्मणजे आपण मागतां तेवढी रक्कम मी गोप्रदान ह्मणून आपणास देईन. हें तिचें बोलणें अर्थातच दादासाहेबांस कबूल न होऊन त्यांनीं सक्तीनें तेवढी रक्कम देण्यास सांगितलें. पण त्यावरही तिनें एकच जबाब दिला कीं, माझा कृतसंकल्प मी कधीं मोडणार नाहीं. आपणास दक्षिणा देतें ती घ्यावी, नाहीं तर मजबरोबर लढाई करून मला जिंकून ती प्राप्त करून घ्यावी. अहल्याबाईच्या या भाषणानें दादासाहेबांस फार चीड येऊन त्यांनीं तिजबरोबर लढाई करण्याचा विचार केला.

या वेळीं अहल्याबाईनें पूर्वींप्रमाणें मदतीकरितां कोणास पत्रें पाठविलीं नाहींत. फार काय सांगावें? इंदुरास तुकोजीराव होता त्यास देखील तिनें आपला बेत न कळवितां कांहीं युक्ति यो-

जून दादासाहेबांची फजीती करण्याचा निश्चय केला. तिनें आपल्या पदरच्या दोनशें दासींना हातांत भाले घेऊन लढाईला तयार राहाण्यास सांगितलें व आपण स्वतःही त्याचप्रमाणें तयारी करून त्यांसह दादासाहेबांबरोबर सामना करण्यास मैदानांत येऊन उभी राहिली !

इकडे हट्टास पेटलेले दादासाहेब आपली तेथें असलेली सर्व फौज बरोबर घेऊन मैदानांत आले आणि पाहतात तों तेथें सर्व स्त्रियांचीच पलटण असून त्यांत पुरुष कोणीही नाहीं असें त्यांस आढळलें. तेव्हां त्यांच्या फौजेंतील लोक बायकांशीं लढण्याची आह्मांला लाज वाटते असें ह्मणून माघारे जाऊं लागले. त्यांनीं अहल्याबाईस असें करण्याचें कारण विचारलें, तेव्हां तिनें सांगितलें कीं, मी श्रीमंत पेशवे यांची आश्रित अशी एक स्त्री आहे तेव्हां अर्थात् माझा सर्व परिवार स्त्रियांचाच असावयाचा. आतां जर मला खुद्द यजमानाशींच लढाईला उभें रहावें लागणार तर याच त्यांनीं दिलेल्या परिवारानिशीं राहिलें पाहिजे. तर तुह्मी आमचा पराभव करून मग वाटेल तर सारें द्रव्य घेऊन जा. त्याशिवायमात्र एक छत्रपति देखील तुह्मांस मिळणार नाहीं. आमच्या चरित्रनायिकेची ही समयोचित योजिलेली युक्ति पाहून दादासाहेब मनांत फार ओशाळले. आणि त्यांनीं तिला सांगितलें कीं, तुझ्या द्रव्याची तूं मालकीण आहेस. त्याचा तूं वाटेल तसा व्यय कर. आह्मी यापुढे त्यावर कधीं डोळा ठेवणार नाहीं. आम्हांस द्रव्य संपादन करण्याचे दुसरे पुष्कळ मार्ग आहेत.

भाग आठवा समाप्त.

# भाग ९ वा.

## अहल्याबाई आणि तुकोजी होळकर.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें खजील झालेले श्रीमंत रघुनाथराव उर्फ राघोबादादा पुण्याकडे चालते झाले. मागून अहल्याबाईच्या आज्ञेप्रमाणें तुकोजी होळकरही आपल्या लवाजम्यानिशीं पुण्यास गेला. तेथें श्रीमंत माधवराव पेशवे यांस भेटून व रीतीप्रमाणें नजराणा देऊन त्यांजकडून त्यानें आपणास होळकराच्या गादीच्या मालकीचीं वस्त्रें संपादन केलीं. तो निघाला त्या वेळीं बाईनें आपले खाजगीकडील शिवबा बाजी व नारो गोपाळ हे दोघे हुशार कारकून त्याजबरोबर पाठविले होते. त्यापैकीं नारो गोपाळ यास श्रीमंतांनीं त्याचे कारभारी नेमिलें व शिवबा बाजी मोठा हुशार व कर्ता पुरुष आहे असें त्यांस वाटल्यावरून त्यांनीं तुकोजीच्या अनुमतानें त्यास आपल्याच पदरीं निरंतर ठेवून घेतलें.

त्यानंतर श्रीमंतांची आज्ञा घेऊन तुकोजी आपल्या कारभाऱ्यासह महेश्वरीं येऊन बाईस भेटला व तिच्या आज्ञेनें अधिकार चालविण्यासाठीं इंदुरास येऊन राहिला. त्यानें मल्हाररावांच्या मरणानें व मालीरावाच्या व्रात्यपणाच्या राज्यपद्धतीनें होळकरांच्या प्रजेंत जें असमाधान झालें होतें तें आपल्या अंगच्या सद्गुणांनीं लवकरच नाहींसें करून व सुभेदारांच्या

मागें त्यांच्या वंशजास योग्य असा पराक्रम गाजवून स्वराज्याची व श्रीमंत पेशवे सरकार यांच्या लौकिकाची. वढती केली. तुकोजीरावाची कारकीर्द एकंदर तीस वर्षांची झाली. तितक्या अवधींत त्यानें अनेक लढाया जिंकल्या, पुष्कळ राजकारस्थानें केलीं, पण तीं येथें सांगण्याचें आम्हांस कांहीं प्रयोजन दिसत नाहीं; फक्त अहल्याबाईशीं त्यानें आपलें वर्तन कसें ठेविलें होतें व त्यामुळें होळकराच्या कुटुंबास सुख आणि भूषण हीं दोन्ही कशीं प्राप्त झालीं हें निवेदन केलें ह्मणजे बस्स झालें व एवढ्यावरूनच आमच्या चरित्रनायिकेच्या अंगी मनुष्याची पारख करण्याचा गुण किती चांगल्या प्रकारें वसत होता याविषयीं वाचकांची खातरी होईल.

अहल्याबाईनें तुकोजीस गादीवर बसविल्या पासून होळकरांच्या राज्याचा अधिकार दोघांत वांटला गेला असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इतिहासाकडे सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें तर राज्यकारभार चालविण्याच्या संबंधानें साधारण असा नियम आढळून येतो कीं, ज्याठिकाणीं गादीस दोन अधिकारी झाले तेथील राज्यकारभार एक आठवडाभरदेखील सुरळीतपणें चालणें कठीण. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, अहल्याबाई आणि तुकोजी होळकर या उभयतांनीं होळकरांचा राज्यशकट एक सारखा तीस वर्षें सुयंत्रित रीतीनें चालविला. दोघांमध्यें एकविचार आणि परस्परांविषयीं पूज्यबुद्धि या सद्गुणांचे पूर्ण वास्तव्य असल्यामुळें त्यांच्या मनांत राज्यलोभ आणि मत्सर यांचा प्रवेश न होतां एकमेकांच्या प्रेमांत कधीं अंतर पडलें नाहीं. तुकोजीराव वयानें मोठा व पूर्ण समंजस आहे असें जाणून होळकरांच्या गादीचा मालक

होण्यास व आपणास सुख आणि संतोष देण्यास अहल्याबाईनें त्यास निवडलें होतें व त्याप्रमाणेंच त्या कृत्यांत तिला पूर्ण यश मिळालें. तुकोजीनेंही आपणावर व आपल्या वंशजांवर उपकार करणाऱ्या या महासाध्वीविषयीं आपल्या अंतःकरणांत निरंतर कृतज्ञता ठेवून तदनुरूप तिजशीं आचरण ठेविलें. लोकांच्या सांगण्यावरून अथवा स्वतंत्रतेची इच्छा धरून हा महाप्रतापी सरदार तिची आज्ञा भंग करण्यास कधीं प्रवृत्त झाला नाहीं. त्या राजपत्नीच्या ठायीं त्यानें केवळ मातेप्रमाणें भाव ठेविला असून तिच्या वचनांत राहण्याविषयीं तो सदा तत्पर असे, व व्यवहारांतही तो त्याच नात्यानें तिला आई ह्मणत असे. तो अहल्याबाईपेक्षां थोडा वयानें अधिक होता, ह्मणून त्यास पुत्र ह्मणण्यास तिला संकोच वाटे, ह्मणून ती त्यास मल्हाररावांचा पुत्र ह्मणवीत असे व आपल्या आज्ञेनें मोहोरेवरही 'मल्हाररावांचा पुत्र तुकोजी' असेच तिनें शब्द लिहविले आहेत. आपण ज्यास पसंत केलें तो आपल्याशीं अशा निर्मलाचरणानें वागतो हें पाहून अहल्याबाईस फार आनंद होत असे, व त्याची कोणतीही इच्छा पूर्ण केल्यावांचून ती राहात नसे. साऱ्या तीस वर्षांच्या कारकीर्दींत अहल्याबाईच्या विचाराविरुद्ध अशी एकच गोष्ट तुकोजीच्या हातून घडली होती व ती अगदीं आरंभींची होती. ती खालीं लिहल्या प्रमाणें—

तुकोजीरावास श्रीमंताकडून वस्त्रें घेण्यास अहल्याबाईनें पुण्यास पाठविलेहोते व त्याबरोबर शिवबा बाजी व नारो गणेश असे आपले दोघे कारकून दिले होते. त्यांपैकीं नारो गणेश यास त्याचे दिवाण नेमून शिवबा बाजीस श्रीमंतांनीं आपल्याजवळ ठेवून घेतलें असें

वर सांगण्यांत आलेंच आहे. आपल्या आज्ञेवांचून तुकोजी व नारो गणेश यांनीं शिवबाबाजीस श्रीमंताजवळ राहाण्याविषयीं अनुमत दिलें ही गोष्ट अहल्याबाईस कळल्यावर तिला फार संताप आला; कारण पदरच्या कोणीही ईसमानें आपल्या परवानगी वांचून कांहीं केल्यास तें तिला मुळींच खपत नसे. आणि हा गुण राज्यकारभार चालविणाराच्या अंगीं असणें अवश्य आहे; नाहींतर एकदां कोणी कोणाचें ऐकत नाहींसें झालें ह्मणजे त्या राज्यांत सर्वत्र बखेडे माजून त्याचा नाश होतो. अहल्याबाईत हा गुण पूर्णपणें वसत असल्यामुळें नारो गणेश महेश्वरीं प्रथम येऊन बाईस भेटलें तेव्हां तिनें त्यास दोष देऊन श्रीमंतांनीं दिलेल्या दिवाणगिरीच्या कामावरून दूर केलें. पुढें कांहीं दिवसांनीं तुकोजी आला व अहल्याबाईस भेटला. त्या वेळीं रागानें त्यास ती असे शब्द बोलली, ' आपली दौलत आपल्या हातानें दुसऱ्याच्या घरांत घातली, तरी कारभारी आपला कारकून केला कीं पांच विसवे तरी त्याचें मन मजकडे ओढेल. तेव्हां दौलतीचा आमचा संबंध राहिला नाहीं. ईश्वरानें सोडविलेंच आहे. तशक्षीं नर्मदातटाकीं महेश्वर पुण्यक्षेत्र आहे तेथें वास करून राहावें हा आमचा मनोधर्म. दौलत तुमचे स्वाधींन केली आहे. वडिलांचा लौकिक सांभाळून श्रीमंतांच्या लोभाचा ओघ शुष्कन पडे यांस जपावें. आमचा परामर्श कराल न कराल याचें चिन्ह दिसतच आहे.' बाईच्या तोंडातून हे रागाचे शब्द निघतांच तुकोजीच्या अंगाचा थरकांप झाला. त्यानें चुकलों ह्मणून आपल्या तोंडांत मारून घेतली. मग हात जोडून तो तिला ह्मणाला " सुभेदार असतांना भाऊबंदकी एकीकडे ठेवून गुलामजादा या वृत्तीने हुकुम बजावीत आलों. त्यांच्या

कूर्मदृष्टीचें हें फल मिळालें. सुभेदार हरएक गोष्टीविषयीं आपले भरंवशावर निश्चित होते. प्रसंगीं सुभेदारांच्या आशीर्वादांचा अनुषंग पाहून मला माणूस केलें. तेव्हां माझे सुभेदार व मातुश्री प्रत्यक्ष आपणच आहांत. साक्षात् मार्तंड येऊन सांगूं लागला तरी या पायांशीं अंतर होणार नाहीं मग प्राण जावो कीं राहो." तुकोजीच्या मुखांतले हे आज्ञाधारकपणाचे शब्द निघालेलें ऐकून हा असा प्रकार पुनः न होऊं देण्याविषयीं निःसंशय जपेल अशी बाईची खातरी झाली, तरी 'बोलण्यांत अर्थ नाहीं, दिसण्यांत येईल तें खरें. बोलण्याप्रमाणें चालणें झालें असतां ईश्वर उपेक्षा करीत नाहीं.' असें अर्थभरित उद्गार तिनें काढिले. खरोखरच तुकोजीनें पुनः असा प्रकार करून अहल्याबाईचें मन कधीं दुखविलें नाहीं.

तुकोजी होळकर यास जरी अहल्याबाईनें सर्व राज्याचें आधिपत्य दिलें होतें, तरी वास्तविक राज्यांची खरी मालकीण अहल्याबाई हीच होती; आणि राज्यांतील सर्व लोक व तसेच होळकरांच्या दरबाराशीं व्यवहार ठेवणारे परकीय राजे तिलाच मुख्य समजत, व कोणत्याही प्रकारचा व्यवहार करणें तो तिजबरोबरच करीत. तथापि यामुळें तुकोजीस कधीं वाईट वाटलें नाहीं व त्यास दिलेल्या अधिकारापेक्षां अधिक अधिकाराची त्यानें कधीं इच्छाही केली नाहीं. तिनें आपल्या सर्व सैन्याची व्यवस्था त्याजकडे दिली होती ती तो उत्तम प्रकारें ठेवून तिच्या आज्ञेप्रमाणें होळकरांस खंडणी देणारे जे अनेक राजे रजवाडे असत त्यांच्याकडून खंडणी वसूल करून ती तिजकडे पाठवीत असे. त्यांत कधींही अफरातफर त्याच्याकडून झाली

नाहीं. याशिवाय होळकरांची कोट्यावधि रुपयांची तिजोरी बाईच्याच स्वाधीन होती व तिचा ती आपल्या मनाप्रमाणें व्यय करीत असे. तरी त्या संबंधानें त्यानें तोंडांतून कधीं चकार शब्द देखील काढिला नाहीं.

अहल्याबाईच्या वचनाची जरब तुकोजीला किती होती याविषयीं एक दोन गोष्टी आहेत त्यांवरून ती चांगली लक्षांत येईल. इंदूर शहरांतला देवीचंद नांवाचा कोणी सावकार मरण पावला त्या वेळीं तुकोजीच्या सैन्याचा तळ इंदूरशहराजवळ पडला असून अहल्याबाई महेश्वरीं होती. त्या सावकारास संतान नव्हतें, तेव्हां कित्येक मतलबी पुरुषांच्या फुसलावणीवरून त्याच्या द्रव्याचा कांहीं भाग प्राप्त व्हावा असें तुकोजीनें मनांत आणिलें व त्याप्रमाणें त्या सावकाराच्या स्त्रियेस सांगून पाठविलें. त्या सावकाराची बायको ताबडतोब महेश्वरीं गेली व अहल्याबाईस सर्व हकीकत निवेदन करून माझें रक्षण करा असें ह्मणाली. बाईनें तिची सर्व हकीकत ऐकून घेतली व ती आपल्या नवऱ्याच्या मालमत्तेची योग्य मालकीण आहे असें ठरवून लागलाच तुकोजीस हुकूम लिहिला कीं, माझ्या शहरांतील लोकांस तुह्मी बिलकूल त्रास देऊं नये व तुह्मी आपली छावणी इंदुरापासून दूर न्यावी. अहल्याबाईचा असा निरोप येतांच तुकोजीनें केलेल्या अपराधाची क्षमा मागून आपली छावणी दूर नेली.

राजपुतान्यांतील एका मांडलिक संस्थानिकाकडे तुकोजी खंडणी मागावयास गेला असतां त्यानें तीं न देतां त्याशीं

युद्ध करण्याची तयारी केली. मग बरेच दिवस दोघांची लढाई चालून तींत होळकरांकडील बरेंच सैन्य जायां होऊन खर्चास शिल्लक नाहींशी झाली; तेव्हां तुकोजीनें हा आलेला प्रसंग महेश्वरीं अहल्याबाईस पत्र पाठवून कळविला, व सैन्याची आणि खर्चाची मदत करावी, नाहीं तर तह करून लढाई मिटवितों असेंही लिहिलें. तुकोजीच्या या कृतीनें बाईस अत्यंत राग येऊन तिनें त्यास उत्तर पाठविलें तें असें--'तुकोजी होळकर मेला तरी चिंता नाहीं; पण पदरच्याकडून असा बदनक्षा करून घेऊं नये. हिंमत न सोडतां त्याचें पारिपत्य करावें. मी इकडून सैन्याचा व पैशाचा पुरवठा करितें. म्हातारा झालास म्हणून लढाईची जरब खाली असल्यास मी स्वतः सैन्य घेऊन येऊन त्याचें पारिपत्य करिते.' असें लिहून त्याचा मुलगा काशीराव यास बरोबर पांच लक्ष रुपये व सैन्याची टोळी देऊन रवाना केलें. अहल्याबाईचें हें पत्र पोंचतांच तिनें दिलेल्या दपटशहाचा त्यास धाक पडून तो पुनः उत्साह धरून शत्रूशीं लढाई करूं लागला व तींत पराक्रमानें म्हणा अथवा बाईच्या पुण्यानें म्हणा त्यानें यश संपादिलें.

आतां वर जी इतकी हकीकत दिली तीवरून अहल्याबाई व तुकोजीराव या दोघांनीं परस्परांविषयीं आपलीं आचरणें कशीं ठेवून आपल्या हयातींत होळकरांची राजसत्ता सर्व प्रजेस सुखावह केली हें कळून येईल. तीस वर्षांत त्या उभयतांमध्यें एक दिवस देखील कोणत्याही बाबतींत भांडण झालेलें कधीं कोणाच्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत आलें नाहीं, व याबद्दल तुकोजीहोळकराची जितकी स्तुति करावी तितकी थोडीच आहे.

कारण, साध्वी अहल्याबाईस तिच्या अंगांतील अपरिमित औदार्यामुळें व इतर सद्गुणामुळें सर्व हिंदुस्थान वाखाणीत होतें; अशा वेळीं तिच्या द्रव्याचा अथवा अधिकाराचा अपहार करण्याचें किंचित्‌ही मनांत आणून त्यानें तिजशीं भांडण केलें असतें, तर सर्व लोक या त्याच्या पापकृत्याबद्दल त्यास शिव्या व शाप दिल्यावांचून कधीं स्वस्थ बसले नसते, व तिच्या मनाविरुद्ध त्यास होळकराच्या गादीचा उपभोग घेणेंही कठीण झालें असतें; पण तो विचारी व दूरदृष्टि असल्यामुळें त्यानें आपल्या महत्वाकांक्षेचा रोंख त्या साध्वीचें प्रिय करून तिचे आशीर्वाद मिळण्याकडेसच धरिला व तिच्या अखेरच्या श्वासापर्यंत तिजशीं एकनिष्ठ सेवक या नात्यानें वागून त्यानें तिजकडून आपलें व आपल्या वंशजांचें कल्याण करून घेतलें, व त्या साध्वीचें वचन पाळल्यानें इहलोकीं चांगलें नांव व परलोकीं पुण्य संपादन केलें. आपल्यावर उपकार करणाऱ्या स्त्रीविषयीं निरंतर कृतज्ञ असणारा तुकोजीसारखा मनुष्य शेंकडों देशांचे इतिहास चाळून पाहिले असतां त्यांत एकादा तरी सांपडेल कीं नाहीं याची वानवाच आहे, असे स्वामिनिष्ठ सेवक ज्या राज्यांत असतात त्याची भरभराट लवकर होते यांत नवल कसलें? साध्वी अहल्याबाईच्या सद्वर्तनानें आणि औदार्यानें होळकरांच्या घराण्यास जितकें भूषण आलें आहे तितकेंच तुकोजीरावाच्या स्वामिभक्तीनें आणि राज्यरीतीनें प्राप्त झालें आहे असें आमच्यानें ह्मटल्यावांचून राहावत नाहीं.

भाग नववा समाप्त.

# भाग १० वा.

## रमाबाई—तीर्थयात्रा

श्रीमंत दादासाहेब पेशवे यांनीं आमच्या चरित्रनायिकेवर जो भयंकर प्रसंग आणिला होता त्यांतून आपली मुक्तता करून घेण्याकरितां तिनें आपली धनीण श्रीमंत माधवरावांची स्त्री रमाबाई इला पत्र पाठविलें होतें व त्या दयार्द्र अंतःकरणाच्या राजपत्नीनें तिच्या इच्छेनुरूप त्या संकटांतून तिची सुटका केली इत्यादि सर्व गोष्टी मागें सांगण्यांत आल्याच आहेत. त्या वेळेपासून आमची चरित्रनायिका व रमाबाई या दोघींच्या अंतःकरणांत परस्पराविषयीं अत्यंत प्रेम उत्पन्न झालें होतें व तें इतकें वाढलें होतें कीं, रमाबाई अहल्याबाईला केवळ आपल्या आईप्रमाणें मानीत असे व अहल्याबाईही तिजवर आपल्या स्वतःच्या मुलीप्रमाणें लोभ करीत असे. या मानिलेल्या मायलेकींचीं दरमहाच्या दरमहा परस्परांस मोठ्या कळकळीचीं पत्रें येत जात असत व त्यांबरोबर प्रेमाची भेट ह्मणून अनेक प्रकारचीं फळें, उंची उंची वस्त्रें व कधीं कधीं मौल्यवान् अलंकारही पाठविले जात. दोघींच्या ठायीं पातिव्रत्य, औदार्य व प्रजावात्सल्य इत्यादि अमूल्य सद्गुणांचा वास असल्यामुळें त्यांची सर्वत्र कीर्ति करणारी अशी नित्य नवी गोष्ट उभयतांना कळत असे; व त्या योगानें परस्परांविषयीं आनंद

आणि अभिमान त्यांच्या मनांत उत्पन्न होत असे. मानवी स्वभावाविषयीं त्यांत विशेषेंकरून स्त्रीस्वभावाविषयीं विचार केला तर असें आढळतें कीं, समान गुणाविषयीं एकीचा होणारा उत्कर्ष दुसरीस कधींही सहन होत नसतो; असें असतां रमाबाई व अहल्याबाई यांच्या मनांत एकमेकींविषयीं मत्सराचा लेशही कधीं न शिरतां केवळ मायलेकीप्रमाणें प्रेमभाव उत्पन्न होऊन तो आमरण कायम राहिला ही मोठीच विलक्षण गोष्ट ह्मटली पाहिजे व तिजकरितां या दोन्ही सद्गुणी व महाराष्ट्र देशाच्या इतिहासास भूषणास्पद झालेल्या स्त्रीरत्नांची जितकी स्तुति करावी तितकी थोडीच. असो.

इसवीसन १७७२ या वर्षीं केवळ अल्पवयस्क असतांही ज्यानीं नीतीनें प्रजापालन केलें व आपल्या शौर्यानें मोठमोठ्या शत्रूंस रणांगणीं दांतीं तृण धरावयास लावून सर्वांकडून आपणांस शाबास ह्मणवून घेतलें, त्या माधवरावांस जबर दुखण्यानें गांठिलें. पुष्कळ औषधोपचार झाले तरी त्यांच्या प्रकृतीस किंचित्ही आराम न पडतां दिवसेंदिवस ती अधिकच बिघडत चालल्यामुळें त्या दुखण्यांत त्यांचा परिणाम झाल्यावांचून राहात नाहीं, अशी सर्वांची खातरी झाली. त्या वेळीं श्रीमंतांच्या समाचाराकरितां त्यांच्या पदरचे सर्व संस्थानिक व जहागीरदार पुण्यास गेले होते, त्यांत आमची चरित्रनायिकाही तेथें गेली. नंतर तिची व रमाबाई यांची भेट झाली असतां दोघींच्याही हृदयांत भडभडून आलें. आपल्या या मानिलेल्या मातेजवळ रमाबाईनें, त्या वेळीं आपल्या घरांत लागलेला कलह, तसाच चुलतसासू आनंदीबाई इनें आपल्याशीं धरिलेला दावा, आणि अशा वेळीं

परमेश्वरानें आपल्यावर आणिलेला भयंकर प्रसंग व तो खरोखर घडून आल्यास पतिव्रताधर्माप्रमाणें सती जाण्याचा आपला झालेला निश्चय इत्यादि सर्व गोष्टी निष्कपटपणानें सांगितल्या व त्या ऐकून अहल्याबाईस अत्यंत दुःख झालें. तथापि ती अनेक प्रकारच्या दुःखांतून पोळून निघाली असल्यामुळें तिनें वारंवार धैर्य देऊन त्या घाबरलेल्या साध्वीचें सांत्वन केलें.

या वेळीं आमच्या चरित्रनायिकेचा मुक्काम बरेंच दिवस पुण्यास झाला होता. तितक्या अवकाशांत तिच्या सद्गुणांची कीर्ति पुणें शहरच्या ज्या स्त्रीपुरुषांच्या कानांवर गेली त्या सर्वांनीं राजवाड्यांत जाऊन तिची भेट घेतली. त्या वेळीं चमत्कार असा झाला कीं, एकाद्या साधूच्या किंवा तीर्थाच्या दर्शनानें जसा चित्तास आनंद होतो त्याप्रमाणें त्या महासाध्वीच्या दर्शनानें सर्वांस झाला असें स्पष्ट दिसून आलें. खऱ्या सद्वर्तनाच्या मनुष्याची योग्यताच अशी आहे कीं, तिच्या योगानें इहलोकीं सर्वांच्या मनांत त्या मनुष्याविषयीं पुज्यबुद्धि वास करिते आणि परलोकीं त्याला चिरकालिक सुख प्राप्त होतें.

तथापि, या सद्गुणांचा हेवा करणारी विधात्याची विलक्षण सृष्टि जगांत दृष्टीस पडत नाहीं असें नाहीं. ज्या साध्वी अहल्याबाईच्या कीर्तिश्रवणानें व प्रत्यक्ष दर्शनानें सकल पुण्यपतनस्थांचीं मनें प्रफुल्लित झालीं तिच्या लोकोत्तर सद्गुणांच्या उत्कर्षानें आपल्या सर्वांगाची आग करून घेणारी एक सुंदर पण दुष्ट स्वभावाची स्त्री खुद्द पेशव्यांच्याच घराण्यांत येऊन राहिली होती; ही कलिकृत्या आनंदीबाई होय, हें आह्मी

सांगितल्यावांचून वाचकांस कळेलच. आपल्या दुर्गुणामुळें होत असलेल्या जननिंदेचें दुःख ही आपल्या सौंदर्याच्या अभिमानानें नाहींसें करण्याचा प्रयत्न करीत असे. अहल्याबाई जोंपर्यंत पुण्यास होती तोंपर्यंत तिला ती कधींही भेटावयास आली नाहीं. अथवा त्या साध्वीच्या दर्शनानें कदाचित् आपली दुष्टबुद्धि फिरून, पुढें पेशवाईचा समूळ उच्छेद करण्याचा आपला बेत ढासळेल कीं काय या भीतीनेंच जणूं काय तिची भेट घेण्याची तिला बुद्धि झाली नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. तरी रोज कानांवर येणारी अहल्याबाईची प्रशंसा तिला दुःसह होऊन एके दिवशीं ती कशी दिसते तें पाहून येण्याकरितां तिनें आपली दासी पाठविली. तेव्हां तिला पाहून येऊन दासीनें सांगितलें कीं, अहल्याबाई रूपानें कांहीं सुंदर नाहीं; तरी तिच्या मुखावर स्वर्गीचें दिव्य तेज चकमत आहे. दासीचे हे शद्ब ऐकतांच ती दुष्ट आनंदीबाई ‘ ती कशीही असो, पण मजसारखी सुंदर तर नाहीं ना ’ असें ह्मणून समाधान पावली ! धन्य तिची !

यानंतर लवकरच आह्मां महाराष्ट्रियांच्या दुर्दैवानें थेऊर मुक्कामीं श्रीमंत माधवरावपेशवे यांचा काल झाला, ( मरणाच्या अगोदर कांहीं दिवस ते तेथें जाऊन राहिले होते.) व त्यांच्या बरोबर त्यांची स्त्री रमाबाई इनें सर्व ऐहिक ऐश्वर्य तुच्छ मानून सहगमन केलें ! ही हकीकत अत्यंत हृदयद्रावक आहे परंतु या ठिकाणीं तिचें वर्णन अप्रासंगिक होईल, ह्मणून तें आह्मी करीत नाहीं; यामुळें वाचकांचा कदाचित् हिरमोड होईल, पण त्यास आमचा इलाज नाहीं. तथापि वाचकांना तो दुःखकारक आणि भयंकर प्रसंग कसा असतो हें समज-

ण्याची जर इच्छाच असेल तर या चरित्रांतील पुढील एका भागांत ती तृप्त करण्याविषयीं आम्ही वचन देतों.

माधवराव व रमाबाई यांच्या अकालिक मृत्युमुळें त्यांच्या प्रजेस व सर्व सरदारांस जें अत्यंत दुःख झालें तें वर्णन करून दाखवितां येत नाहीं. त्या भयंकर प्रसंगानें आमच्या चरित्र-नायिकेच्या अंतःकरणास मोठा चटका लागून गेला. परमोदार व शूर अशा आपल्या धन्यावर दुष्ट कालानें एकाएकीं धाड घातल्यामुळें व त्याच्याबरोबर अल्पवयस्क असून अनेक सद्गुणांची जी केवळ खाण, व जिनें आपल्यावर मातेप्रमाणें प्रेम ठेविलें, त्या आपल्या धनिणीनें सहगमन केल्यामुळें स्वतःवर आलेल्या पूर्वींच्या प्रसंगाची तिला आठवण झाली व ऐहिक स्थितीचा तिटकारा येऊन ती अगदीं विरक्त झाली, आणि त्यामुळें, सर्व राजेरजवाडे पुण्यांतून निघून गेल्यावर तिनें आपल्या राजधानीस परत न जातां तीर्थयात्रा करण्याचा निश्चय केला.

नंतर सर्वांचा निरोप घेऊन साध्वी अहल्याबाई पुण्यापासून जवळच जेजुरी येथे जें होळकरांचें कुलदैवत आहे त्या खंडो-बाच्या दर्शनास गेली व आपल्या कुलस्वामीसंनिध कांहीं दिवस वास केल्यावर पुढें तीर्थयात्रेकरितां बेताचीच मंडळी जवळ ठेवून बाकीच्या लोकांस तिनें परत महेश्वरास पाठविलें, व क्रमानें प्रथम दक्षिणेकडून सर्व तीर्थें करीत जाण्याचा विचार केला.

आमच्या चरित्रनायिकेच्या एकंदर आयुष्यक्रमांत तिनें केलेल्या तीर्थयात्रेचा भाग अत्यंत महत्वाचा व पुण्यकारक आहे. तथापि

त्याची सविस्तर हकीगत वाचल्यापासून क्षेत्राचें पवित्र माहात्म्य ऐकण्यापेक्षां तेथील नैसर्गिक सृष्टिसौंदर्याचेंच वर्णन वाचण्याकडे आपल्या चित्ताची विशेष प्रवृत्ति ठेवणाऱ्या वाचकांचें मनोरंजन होईल किंवा नाहीं याची आम्हांस जबरदस्त शंका येत असल्या-मुळें आम्ही ती येथें देण्याच्या भरीस पडत नाहीं. मात्र इतकेंच सांगतों कीं, शेंसवाशें वर्षांपूर्वी तीर्थयात्रा करण्याकरितां अनु-ल्लंघ्य आणि परम भयंकर अशा पर्वतांच्या कड्यावरून व ज्यांत गगनचुंबित वृक्ष व हिंस्त्र प्राणी अतिशय आ-हेत अशा निबिड महारण्यांतून जिवाची आशा सोडून केवळ परमेश्वरावर हवाला ठेवून जावें लागे; त्यावेळीं पादचारी यात्रेकऱ्यांस प्रवास करतानां जो ताप सहन करावा लागत असे त्याची कल्पना अपणासारख्या सांप्रतकाळीं आ-गगाडींतून सुखानें प्रवास करणाऱ्यांस होणें नाहीं. तथापि आमच्या चरित्रनायिकेनें तत्संबंधीं सर्व दुःखें सोसून आळंदी, देहु, पंढर-पुर, कोल्हापुर, गिरि, रामेश्वर वगैरे दक्षिणेंतील सर्व तीर्थें; पश्चिमेकडील, डाकूर, द्वारका वगैरे परमेश्वराचीं निवासस्थानें, तशींच पूर्वेकडील गया, काशी, प्रयाग इत्यादि पुण्यभूमि आणि अयोध्या, मथुरा, वृंदावन, गंगोत्री, बदरीकेदार वगैरे उत्तरेकडील पवित्र क्षेत्रें ह्या सर्वांचें दर्शन घेतलें; आणि याशिवाय, गंगा, यमुना, नर्मदा, तापी, कावेरी, कृष्णा, तुंगभद्रा इत्यादि महानद्यांच्या पापनाशक जलांनीं स्नानें करून आपल्या देहाचें सार्थक्य केलें. ज्या ज्या क्षेत्रीं तिचें जाणें झाले त्यांची माहात्म्यें तेथील लोकां-कडून तिनें श्रवण केलीं, आणि त्यांत सांगितल्याप्रमाणें देहदंड करून घेऊन आपली तीर्थयात्रा परिपूर्ण केली.

महेश्वरास असतां ज्या बाईच्या हातून नित्य हजारों रुपये दानधर्म होत असे तिच्या हातून क्षेत्रांच्या ठायीं किती झाला असेल तो एकाद्या विवक्षित संख्येनें दाखविण्याचें आह्मी धाडस करीत नाहीं. ब्राह्मणभोजनें, देवांच्या महापूजा वगैरे तीर्थांच्या ठायीं आवश्यक करावीं लागणारीं दानकर्में, तीर्थयात्रा करणारे सर्व श्रीमान् अथवा गरीब लोक आपआपल्या ऐपतीप्रमाणें करितातच; तरी त्या योगानें होणारी त्यांची कीर्ति अल्पकाल राहून मागून नष्ट होते; ह्मणूनच कीं काय, या पुण्यवान् स्त्रीचें नांव चिरकाल राखण्यासाठीं परमेश्वरानें तिच्या हातून मोठमोठीं सत्कृत्यें करविलीं. या हिंदुस्थानांत जगन्नाथापासून तहत द्वारकेपर्यंत पूर्वपश्चिम व हिमालयाच्या शिखरावर बर्फांत गढून गेलेल्या केदारनाथापासून तों समुद्रांत असलेल्या रामेश्वरापर्यंत दक्षिणोत्तर जीं जीं ह्मणून आपलीं पुण्यस्थानें आहेत त्या त्या ठिकाणीं या महासाध्वीनें करून ठेविलेलीं आपलीं चिरकालिक स्मारकें तिच्या परोपकाराची व थोरपणाची अद्याप साक्ष देत आहेत. कांहीं देवस्थानांचीं जीर्ण झालेलीं मंदिरें तिनें दुरुस्त केलेलीं आहेत; कांहींचीं नवीन बांधिलीं आहेत; कांहीं ठिकाणीं देवस्थानांस इनामें करून दिलेलीं आहेत, व कांहीं ठिकाणीं देवांस नित्य गंगोदक मिळेल अशी व्यवस्था केली आहे; तसेंच गरीब लोकां-करितां कोठें अन्नछत्रें, व कोठें पाणपोया घालून कोठें धर्मशाळा, तळीं, विहिरी बांधिल्या आहेत, व त्या सर्वांची निरंतरची व्यव-स्था सुरळितपणें चालविण्याकरितां तिनें आपल्या राज्यांतले कांहीं परगणे निराळे काढून ठेवून त्यांचें वार्षिक उत्पन्न त्यांस मिळत जाईल अशी तजवीज केलेली आहे व तदनुसार आज पर्यंत ती चालली आहे.

तीर्थयात्रेप्रमाणेंच पुराणश्रवण व साधुपुरुषदर्शन हीं धर्मशास्त्रांत परलोकप्राप्तीचीं मोठीं साधनें सांगितलीं आहेत, ह्मणून पुण्याहून तीर्थयात्रेचा संकल्प करून निघते वेळीं अहल्याबाईनें आपल्या बरोबर एका विद्वान् व कर्मठ पुराणिकास घेतलें होतें, आणि त्याकडून तीर्थयात्रेच्या कालांत भारत, भागवत, रामायण इत्यादि सर्व ग्रंथ तिनें भक्तिपूर्वक श्रवण केले. तसेंच परमेश्वर प्राप्तीसाठीं निरिच्छपणें सर्व ऐहिक व्यापार सोडून गिरिकंदरीं, व घोर अरण्यामध्यें बसलेल्या ज्या पुरुषांचें तिला वर्तमान कळलें त्यांचेंही दर्शन घेऊन तिनें आपणांस धन्य मानिलें.

या ठिकाणीं आणखी हेंही सांगितलें पाहिजे कीं, आमच्या चरित्रनायिकेस तीर्थयात्रेच्यासंबंधानें ज्या ज्या ठिकाणीं जाण्याचा योग आला तीं ठिकाणें ज्या संस्थानिकांच्या अधिकाराखालीं होतीं त्या सर्वांच्या कानावर अहल्याबाईच्या अंगीं असलेल्या सद्गुणांची कीर्ति गेलेली होती; ह्मणून अशी साध्वी आपल्या राज्यांत आली हा आपला केवळ भाग्योदयच होय, असें त्यांस वाटून त्यांनीं आपणाकडून होईल तितकी तिची बरदास्त ठेविली व तिला पाहण्याची आपली इच्छा प्रत्यक्ष तिला भेटून पूर्ण केली. आपणाविषयीं त्यांनीं दाखविलेल्या कळकळीबद्दल अहल्याबाईनेंही त्यांची योग्य स्तुति करून आभार मानिले.

याप्रमाणें साध्वी अहल्याबाईचा तीर्थयात्राक्रम असा सुखावह रीतीनें चालला असतां पुण्याकडे आणखी एक भयंकर वर्तमान घडल्याचें तिच्या कानावर आलें. स्त्री बुद्धिः

प्रलयं गता अशी एक ह्मण आहे; तदनुसार वागणाऱ्या ज्या राघोबानें होळकरांच्या राज्यावर गदा आणली होती पण त्याला यश न मिळतां तो फजित होऊन माघारा गेला होता त्यानें श्रीमंत माधवरावांच्या मागून पेशवाईच्या गादीवर विराजमान झालेला आपला पुतण्या जो नारायणराव त्याला गार्द्यांकडून ठार मारवून आपण पेशवाईचा उपभोग घेऊं लागला. राघोबाचें हें भयंकर कृत्य ऐकतांच अहल्याबाईस अत्यंत दुःख झालें व त्याच्या त्या कृतीचा संताप येऊन तिनें त्यांस शाप दिले, व यापुढें पेशवाईची धडगत दिसत नाहीं असें त्या वेळींच तिनें भविष्य केलें. असो.

यानंतर थोड्याच दिवसांत तुकोजीकडून अहल्याबाईस अशा आशयाचें पत्र आलें कीं, पेशव्यांच्या सर्व कारभारी मंडळींनीं राघोबास पदच्युत करण्याची मसलत केली असून त्या कामांत आपलें साह्य मागितल्यावरून मला पुण्यास जाणें अवश्य आहे; यासाठीं मातुश्रींनीं तीर्थयात्रा संपवून लवकर येथें यावें, व मी पुण्यास असें तोंपर्यंत राज्यकारभार पाहावा. तुकोजीचें असें पत्र येतांच तिला आपली तीर्थयात्रा आटपून इंदुरास जाणें भाग पडलें.

इंदुरास आल्यावर अहल्याबाईची व तुकोजीची भेट होऊन त्यानें सर्व राज्याची सूत्रें तिच्या हातीं दिलीं व आपण पुण्यास निघून गेला. यापुढें तिकडे एकामागून एक अशीं इतक्या भानगडीचीं राज्यकारस्थानें उत्पन्न झाली कीं त्यासर्वांत त्याला प्रमुखत्व घेणें भाग पडून अहल्याबाईचा अंतकाल होईपर्यंत

इंदुरास येतां आलें नाहीं. पण तितक्या काळांत अहल्याबाईनें आपल्या हातांत घेतलेला होळकरांच्या राज्याचा कारभार इतक्या उत्तम रीतीने बजावला कीं तिच्या कारकीर्दींत होळकरांच्या प्रजेस आपण रामराज्यांतच आहों कीं काय असा भास झाला. आतां तिनें तो कसा केला याचें सविस्तर वर्णन करणें तें पुढील भागांत करूं.

भाग दहावा समाप्त.

# भाग ११ वा.

## राज्यकारभार.

मुंबईचे माजी गव्हरनर सर जान मालकम साहेब हे माळव्यांत असतांना त्यांच्या कानावर आमच्या चरित्रनायिकेच्या निर्दोष राज्यकारभाराची कीर्ति नित्यशः येत असे. त्या वेळीं तत्पूर्वी अखिल भूमंडलावर जे थोर आणि प्रजापालनदक्ष भूपति होऊन गेले, त्यांच्याही राज्यरीतींत जी सुव्यवस्था आढळावयाची नाहीं ती तिच्या राज्यांत असलेली माळव्यांतील लोकांच्या तोंडून ऐकून तींत सत्यापेक्षां असत्याचा भाग अधिक असावा असा त्यांस संशय आला. मग त्या दीर्वोद्योगी व चौकस साहेबांनीं तिच्या राज्यकारभारसंबंधानें अनेक प्रकारचे पुरावे गोळा करून विचार केल्यावर त्यांचा तो सर्व संशय खोटा ठरून आपण ऐकिल्यापेक्षांही त्या अलौकिक स्त्रीची तिच्या न्यायी राज्यपद्धतीसंबंधानें अधिक कीर्ति व्हावयास पाहिजे अशी त्यांची खातरी झाली, व मोठ्या संतोषानें आपल्या देशबांधवांस ती माहित होण्याकरितां स्वतः लिहिलेला 'मध्यहिंदुस्थानचा इतिहास' या पुस्तकांत त्यांणीं ती लिहून दाखल केली. अंगीं योग्य सद्गुण असले ह्मणजे कोणाचाही स्वकीयांकडून गौरव होतो हें ठीकच आहे; पण तो परकीयांकडून होण्यास पूर्वपुण्याईचें सहाय असावें लागतें व तें या

पुण्यशील स्त्रीला भरपूर होतेंच. वर सांगितलेले साहेब मजकूर परकीय असतां त्यांनीं होळकरांच्या घराण्यास भूषणास्पद झालेल्या या अद्वितीय स्त्रीचा तिच्या राज्यपद्धतीबद्दल केलेला गौरव तिनेंच काय, पण आपण सर्व महाराष्ट्रीयांनींही अभिमान धरण्याजोगा आहे असें आह्मांस वाटतें. आतां तिची न्यायी राज्यपद्धति कशा प्रकारची होती व ती होळकरांच्या प्रजेस कशी सुखावह झाली हें पाहिलें पाहिजे.

श्रीमंत अहल्याबाईसाहेब ( या भागापासून आह्मी आमच्या चरित्रनायिकेचा या बहुमानार्थी नांवानें उल्लेख केला आहे. ) यांनीं होळकरांच्या राज्याचीं सूत्रें आपल्या हातीं घेतल्यावर गोविंदपंत गानू ह्मणून कोणी ब्राह्मण मोठा हुषार व प्रामाणिक असल्याबद्दल त्याचा नांवलौकिक त्यांस कळल्यावरून त्यांनीं त्यास आपल्या दरबारीं बोलाविलें व त्याची योग्य परीक्षा करून त्यास आपल्या मुख्य कारभाऱ्याच्या जागीं नेमिलें. प्रथमतः त्यांनीं त्याच्याकडून आपल्या सासऱ्याच्या वेळेस जे कायदे सुरू होते ते आपल्या प्रजेस अधिक सुखावह होतील अशा रीतीनें सुधारून ते सर्व राज्यांत चालू केले. त्यांच्या चांगल्या राज्यव्यवस्थेचा मूळ पाया ह्मटला ह्मणजे शेतकऱ्यांपासून त्यांच्या उत्पन्नाप्रमाणें नेमस्त सारा घेणें व गांवांतील पाटीलकुळकर्णी यांचे वंशपरंपरेनें चालत असलेले हक्क त्यांकडेस कायम राखणें; तसेंच प्रत्येक महालाच्या ठिकाणीं योग्य कामगार नेमून त्याकडून त्यांतील रयतेचें संरक्षण करून तिजपासून ठरलेला वसूल गोळा करणें हा होता. ज्या राज्यांत एकदा कोणत्याही कामावर नेमिलेले कामगार

वरचेवर बदलले जात नाहींत तें राज्य चांगलें अशी त्या काळीं आपल्या राजेरजवाड्यांची समजूत होती, व म्हणूनच ते कोणास एकाद्या अधिकारावर नेमावयाचें झालें ह्मणजे त्याविषयीं फार विचार करून मग त्याला नेमीत असत. अहल्याबाईसाहेबांचीही तशीच समजूत असल्यामुळें त्यांनीं आपल्या महालनिहाय जे कामगार नेमिले त्यांना प्रथम चांगले कसोटीस लावून मग नेमिले; यामुळें असें झालें कीं, त्या कामगारांपैकीं बहुतेक अखेरपर्यंत कायम राहिले.

आपल्या राज्याची अंतर्व्यवस्था सुधारणें व प्रजेस न्याय मिळण्याविषयीं तजवीज करणें हीं दोन्ही कामें करण्याविषयीं बाईसाहेबांनीं पुष्कळ श्रम घेतले. होळकरांच्या राज्यांत डोंगरांत राहणारे भिल्ल व गोंडलोक पुष्कळ असून ते लुटालुटी करून आपला निर्वाह करीत असल्यामुळें त्यांपासून लोकांस पुष्कळ ताप सोसावा लागत असे. त्यांचा बंदोबस्त ठिकठिकाणीं नाकीं बसवून त्यांनीं केला. हा करते वेळीं त्या रानटी लोकांकडून त्यांस अनेक वेळां हरकती झाल्या, तरी त्यांस न जुमानितां त्यांनीं त्यांची खोड मोडिली; तथापि त्यांस शिक्षा वगैरे न देतां दया व सामोपचार यांची योजना करून जे शरण आले त्यांस लुटालूट करून निर्वाह करण्यापेक्षां दुसरे चांगले धंदे करण्याविषयीं ताकीद दिली व त्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या वहिवाटीचा विचार करून डोंगरांतून जो माल जात येत असे त्यावर अगदीं थोडा कर घेण्याविषयीं त्यांस परवानगी दिली. या करास भीलकवडी असें ह्मणत व तो मालानें लादलेल्या प्रत्येक बैलामागें सुमारें अर्धा पैसा इतका

असे. याशिवाय त्या रानटी लोकांस बाईसाहेबांनीं कांहीं पडित जमिनी इनामादाखल देऊन त्याबद्दल त्यांच्या पासून रस्ते संभाळण्याचा व त्यांच्या हद्दींत कांहीं माल चोरीस गेल्यास त्याचा पत्ता लावून देण्याचा करार करून घेतला. या रानटी लोकांस अशा चांगल्या मार्गास लाविल्यामुळें त्यांस पुढें निर्भयपणें जें कुटुंब सुख भोगावयास मिळालें त्याबद्दल त्यांनीं बाईसाहेबांचे अत्यंत उपकार मानिलें. असें झालें तरी त्यांच्यांत मनरूपसिंग वगैरे कित्येक अत्यंत दुष्ट लोक होते ते कांहीं केल्या लोकांस लुटण्याचा व प्रसंग पडल्यास त्यांचा प्राणनाशही करण्याचा आपला पूर्वींचा क्रम सोडीनात तेव्हां शेंकडों निरपराधी लोकांचें जीव वांचविण्याकरितां निर्दयपणा करून त्यांस देहांत शिक्षा देणें त्यांना भाग पडलें. त्या रानटी लोकांपासून प्रजेला होणारा त्रास नाहींसा करणें हें जसें आपलें कर्तव्यकर्म आहे; तसेंच आपल्या प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकून न्याय देणें हेंही आहे असें बाईसाहेबांस वाटलें; ह्मणून गांवोगांव न्याय देणारे पंचाधिकारी नेमून त्याकडून लोकांच्या अर्जांचा व फिर्यादींचा योग्य व लवकर निकाल लागेल अशी त्यांणीं व्यवस्था केली होती, व राजधानीच्या ठिकाणीं मुख्य न्यायाधीश नेमून त्यास त्यांच्या निकालांत अन्याय न होऊं देण्याविषयीं खबरदारी ठेवण्याची सक्त ताकीद दिली होती. इतकें असतांही जर कोणाची इच्छा स्वतः त्यांच्याकडेच फिर्याद करण्याची असली तर त्यास तसें करण्यास मुळींच हरकत होत नसे. त्या फिर्यादीची चौकशी त्या जातीनें करीत असत, व ती किती जरी क्षुल्लक असली तरी तिजकडे दुर्लक्ष्य करीत नसत.

याशिवाय कधीं कोणाच्या अपराधाची चौकशी करण्या-

ज्या प्रसंग आल्यास त्यावेळीं न्याय आणि दया हीं दोन्ही अंतःकरणांत जागृत ठेवून व फिर्यादी आणि आरोपी या दोन्ही पक्षांच्या पुराव्याचा योग्य विचार करून अपराध्यास शासन करणें तें करीत. आपण या लोकीं जें कांहीं चांगलें किंवा वाईट करितों त्याचा परलोकीं परमेश्वरापाशीं आपणास जाब द्यावा लागेल ही बुद्धि त्यांच्या हृदयांत नेहमीं वास करीत असे; यामुळें केवळ अधिकाराच्या जोरावर व केवळ लोकांच्या सांगण्यावर त्यांच्याकडून न्यायाची पायमल्ली कधीं झाली नाहीं. त्यांच्या प्रत्येक निकालांत न्याय आणि दया हीं दोन्ही स्पष्ट दिसून येत. त्यांच्या एकंदर सर्व कारकीर्दींत देहांत शिक्षेचीं उदाहरणें ह्मटलीं तर तीं अगदींच थोडीं आहेत. तीं इतकीं कीं एका हाताच्या बोटाइतकीं देखील नाहींत. त्यांच्या हाताखालच्या कामगारांपैकीं कोणी त्यांस कोणास फांशींची शिक्षा देण्यास सांगितलें असतां त्यांस त्या उत्तर देत कीं बाबांनों, आपणा सर्वांस मरावयाचें आहे, तेव्हां ईश्वरानें उत्पन्न केलेल्या प्राण्याचा जीव आपण एकाएकीं कसा घ्यावा बरें ?

हल्लीं होळकरांच्या राजधानीचें जें इंदूर शहर आहे तें त्यावेळीं अगदीं लहान खेडें होतें. त्यास अहल्याबाईसाहेबांनीं मातब्बर व विस्तीर्ण अशा शहराची योग्यता आणिली. श्रीमंत बाजीराव बल्लाळ पेशवे यांनीं पुणें शहराची वसती वाढविण्याकरितां दुसऱ्या शहरांतून व्यापारी व इतर कारागीर लोक आणून त्यांस घरें बांधण्याकरितां मुफत जागा देण्याची प्रथम जशी व्यवस्था केली होती तशीच इंदूरची वसती वाढविण्यासाठीं बाईसाहेबांनीं केली. या रीतीनें तेथें बाजारपेठ व बरींच घरें लोकांनीं बांधिल्यावर त्यांनीं

तेथें हौद देवळें वगैरे ठिकठिकाणीं बांधिलीं. स्वतः बाईसाहेब जरी नेहमीं महेश्वरास राहात असत तरी या शहरावर व त्यांतील लोकांवर त्यांची अत्यंत कृपा असे. त्यांच्या संपत्तीची भरभराट होत चालली असतां तीपासून आपणास किंचित्‌ही अधिक प्राप्ति करून घेण्याची इच्छा न करितां तिचें संरक्षण करण्याविषयीं त्या नेमलेल्या अधिकाऱ्याकडून फार खबरदारी घेववीत असत. असें सांगतात कीं, खंडेराव नांवाचा कोणी ब्राह्मण इंदूर येथें कमाविसदारीचें काम पाहात होता, त्याकडून वेळचे-वेळीं वसूल गोळा होई हें पाहून बाईसाहेबांस जितका आनंद होई त्यापेक्षां तेथील आपली रय्यत अत्यंत सुखी व समाधानी आहे हें पाहून अधिक आनंद होई. आपल्या राज्यकर्त्रीचें आपल्यावर असें मातेप्रमाणें निस्सीम प्रेम पाहून इंदूरच्या सर्व लोकांस तिचा मोठा अभिमान वाटत असे व त्यामुळें ते केवळ देवाप्रमाणें तिजवर भक्ति ठेवीत.

होळकरांच्या राज्यांत खुद्द बाईसाहेबांपाशीं थोडीशीं शिबंदी फौज मात्र होती; मुख्य फौजेपैकीं कांहीं दक्षिणेंत तुकोजी होळकराबरोबर व कांहीं उत्तरहिंदुस्थानांत गुंतलेली असे; तरी तिची व्यवस्था फार चांगल्या प्रकारची ठेविलेली असल्यामुळें आपल्या राज्याचें रक्षण करण्यास ती त्यांस पुरेशी होती. त्यांच्या राज्यांत अन्यायाला मुळींच थारा मिळत नसल्यामुळें कधीं दंगेधोपे होत नसत, व आपल्या प्रजेच्या सुखाविषयीं त्या फार दक्षपणा ठेवीत असल्यामुळें हाताखालच्या कामगारांस आपल्या प्रांतांतील लोकांवर जुलूम करण्यास मुळींच धीर होत नसे. वेळचे वेळीं वसूल गोळा करून ते त्यांजकडे पाठवीत

असत व त्यांची इतराजी कधीं न होईल असें आपलें वर्तन ठेवीत असत.

बाईसाहेब राज्य करूं लागल्यापासून प्रत्येक बाबतींत त्यांनीं आपल्या अंगीं असलेल्या दोन्ही गुणांचा प्रसंग दिसेल त्याप्रमाणें उपयोग केला. एक गुण दया आणि दुसरा धाक. प्रजेस सन्मार्गाकडे वळविण्याकरितां दया आणि दंड हीं दोन्हीं साधनें राज्यकर्त्याच्या अंगी असणें अवश्य आहे. तीं अहल्याबाईसाहेबांच्या अंगीं पूर्णत्वानें वास करीत होतीं व त्यांचा प्रसंग पाहून त्या उपयोग करीत असत. बारिकसारिक अन्याय कोणाकडून घडला असतां त्या त्याच्यावर दया करीत व पुनः तसें न करण्याविषयीं ताकीद देत. या त्यांच्या स्वभावामुळें कधीं कधीं मोठे अपराधी देखील क्षमेच्या आशेनें आपला अपराध आपण होऊन कबूल करीत. पण चोऱ्या वगैरे अपराधाबद्दल त्या कधीं क्षमा करीत नसत. धाक दाखविण्याच्यासंबंधानें इतकी विलक्षण हातोटी त्यांस साधून गेली होती कीं, अत्यंत कठोर अंतःकरणाचा व निगर्गट्ट असा जरी कोणी अपराधी असला तरी त्याच्या मनांत त्या दहशत उत्पन्न करून त्याकडून अपराध कबूल करवीत व त्यास योग्य शासन देत. या त्यांच्या धाकाचा दुसरा असाही उपयोग होत असे कीं, त्यांच्या पदरच्या हक्कदाराकडून कधीं खंड वगैरे येण्यास उशीर लागल्यास त्यांनीं त्यांस जरा रागाचें पत्र पाठवावें ह्मणजे लागलाच तो त्यांकडून रवाना होत असे.

अहल्याबाईसाहेबांनीं राज्यकारभार आपल्या अंगावर घे-

तल्यापासून त्या जातीनें खुल्या दरबारांत जात असत व सर्व सरकारी काम मोठ्या आस्थेनें करीत असत. वसुलाचा जमा-खर्च व हिशोब ठेवण्यांत केवळ कारभाऱ्यांवर विश्वास न ठेवितां त्या आपण स्वतः तपासून पाहात असत व त्यांत कितीही श्रम झाले तरी त्याकडे दुर्लक्ष करीत नसत. खर्चापेक्षां उत्पन्न अधिक असणें हें चांगलें, ह्मणून तें वाढत्या प्रमाणावर असण्याविषयीं त्या फार खबरदारी घेत; तथापि अन्यायानें त्यांतील वाढलेला एक पैसाही त्यांस सहन होत नसे. फार काय सांगावें ? नजरनजराणा घेणें हा कांहीं अन्याय नव्हे असा त्या वेळीं सर्व मराठे लोकांचा समज असतांही त्यांनीं ती रीत वाईट असें मानलें होतें. मोठमोठे शेटसावकार व वाणीउदमी लोक आपल्या कामाकरितां बाईसाहेबांकडे अनेक प्रकारचा नजराणा आणीत असत; पण त्याचा त्यांनीं कधीं देखील स्वीकार केला नाहीं. हा नियम जसा त्या जातीनें पाळीत तसाच आपल्या पदरच्या अमलदारांस पाळण्याविषयींहीं त्यांची सक्त ताकीद असे. त्या असें ह्मणत कीं, नजराणा घेण्याची कोणास लालूच लागली ह्मणजे त्याच्या हातून न्यायापेक्षां अन्याय अधिक होण्याचा संभव आहे.

आपल्या प्रजेच्या मालमत्तेविषयीं बाईसाहेब किती निरपेक्ष असत याची चांगली खातरी होण्यासाठीं त्यांच्या कारकीर्दींतल्या एक दोन गोष्टी येथें सांगणें आह्मांस अवश्य वाटतें. त्या वेळीं सिरोजपरगणा होळकरांच्या अमलाखालीं असतांना तेथील खेमदास नांवाचा कोणी कोट्याधीश सावकार मरण पावला. त्याच्या पोटीं संतान नसल्यामुळें त्याची बायको आपल्या पुतण्यास दत्तक घेण्याचा विचार करूं लागली; पण त्या प्रांताच्या

कमाविसदारास सावकाराच्या दौलतीचा अभिलाष उत्पन्न होऊन त्यानें त्या बाईपाशीं तीन लक्ष रुपये नजराणा ह्मणून मागितले व ते दिल्याशिवाय मी दत्तक घेऊं देणार नाहीं असें सांगितलें. याशिवाय आणखी त्यानें तिला अशीही धमकी दिली कीं इतका नजराणा जर मला मिळाला नाहीं तर तुझ्या नवऱ्याची सर्व मालमत्ता बेवारसी ह्मणून मी सरकारांत जप्त करीन. बिचाऱ्या खेमदासाच्या बायकोस हा कमाविसदाराचा दपटशहा केवळ जुलूम वाटून ती आपल्या भावी दत्तक मुलास व दुसऱ्या पुष्कळ सोयऱ्याधायऱ्यांस बरोबर घेऊन महेश्वरीं बाईसाहेबांकडे गेली व त्यांच्या पायांवर डोकें ठेवून व त्यांस सर्व हकीकत सांगून मला न्याय द्या असें ह्मणाली. बाईसाहेबांनीं एक दिवस देखील तिला ‘ काय होईल कसें होईल ’ अशा दुग्ध्यांत न ठेवितां व तिजपासून कांहींएक नजराणा न घेतां तिचा तो दत्तक कबूल करून त्यास आपल्या मांडीवर घेतलें व वस्त्रें, दागिने त्यास देऊन त्याच्या तोंडांत साखर घातली. नंतर पालखींत बसवून मोठ्या थाटानें त्याची त्यांनीं सिरोंजेस रवानगी केली व त्या लोभी कमाविसदारास त्याच्या अन्यायाचरणाबद्दल कामावरून दूर केलें.

दुसरी एक अशी गोष्ट आहे कीं, खरगोण येथें तापीदास व बनारसदास ह्मणून दोघे बंधु मोठे श्रीमान् सावकार होते व ते दोघेहीं पोटीं संतान नसतानांच एका मागून एक असें एका वर्षाच्या आंत परलोकवासी झाले. मरते वेळीं त्या दोघांजवळ दोन लक्ष रुपये रोख होते व दोन लक्ष त्यांच्या कुळांकडे येणें होते. तेव्हां तापीदासाच्या बायकोनें अहल्याबाईसाहेबांस असें कळविलें

कीं तुमच्या संगोपनाखालीं माझ्या नवऱ्यानें व दिरानें मिळविलेली सर्व संपत्ति मी तुम्हांस स्वसंतोषानें देतें. तापीदासाच्या बायकोच्या या म्हणण्यावर तिला बाईसाहेबांनीं असें सांगितलें कीं, मला तुझ्या संपत्तीचा कांहीं उपयोग होणार नाहीं. तुला जर ती नकोशी झाली असेल तर ब्राह्मणांस धर्म कर किंवा तुझ्या नवऱ्याचें नांव मागें राहील असें एकादें स्तुत्य व लोकोपयोगीं स्मारक करण्यांत तिचा उपयोग कर. (बाईसाहेबांचे हें म्हणणें तापीदासाच्या बायकोनें मान्य केलें व खरगोणच्या नदीस तिनें मोठा घांट बांधून त्यावर आपल्या नवऱ्याच्या नांवानें श्रीगणपतीचें अत्यंत सुंदर असें देऊळ बांधिलें.) हीं दोन्ही कृत्यें तिच्या दौलतीच्या सद्विनियोगाची व अहल्याबाईसाहेबांच्या निरपेक्ष व निर्लोभ बुद्धीची अद्यापि खरगोण येथें साक्ष देत आहेत.

आपल्या राज्यांत आपल्या धर्मातील प्रजेविषयीं बाईसाहेब जशी काळजी घेत असत त्याप्रमाणेंच मुसलमान वगैरे परधर्मी लोकांविषयींही घेत असत. परधर्मांचा छळ व हेलना करावी असें अगोदर हिंदुधर्मांत कोठें सांगितलें नाहींच; पण बाईसाहेब याच्याही पुढें असत. ज्याप्रमाणें हिंदुलोकांस आपल्या चालीरीति पाळण्याची पूर्णपणें मोकळीक असे त्याप्रमाणेंच इतर विधर्मी लोकांसही असे, व त्यांच्यावर कोणत्याही बाबतींत केवळ धर्मसंबंधानें कसलीही सक्ती त्यांच्याकडून होत नसे. आपल्या लोकांच्या वहिवाटी व हक्क जसे त्यांनीं चालू ठेविले होते तसेच त्यांचेही चालू ठेविले होते, व जे सरकारी कायद्याचे नियम यांस लागू होते तेच त्यांसही लागू केले होते.

सारांश, परमेश्वराच्या घरीं सर्व धर्म सारखे आहेत, त्यांत अमुक चांगला, व अमुक वाईट असें मुळींच नाहीं असें त्यांचें मत असल्यामुळें स्वधर्मांतील लोकांस त्यांच्याकडून जें सुख प्राप्त झालें तेंच परधर्मांतील लोकांसही मिळालें होतें व त्यामुळें त्या स्वकीय लोकांस जितक्या पूज्य आणि आवडत्या झाल्या होत्या तितक्याच परकीय लोकांसही झाल्या होत्या. सर्व लोकांस सारख्या रीतीनें वागविण्यांत जी राज्यपद्धति अकबरबादशाहानें व त्याच्या मागून शिवाजीमहाराजांनीं घालून दिली होती तिचेंच त्यांनीं अनुकरण केलें होतें.

कोणीही मनुष्य एकदां एका कामांतून निघून दुसऱ्या कामांत पडला ह्मणजे पूर्वीच्या कामासंबंधाचा त्याचा सर्व व्यासंग सुटतो असा सर्वत्र नियम आहे; पण अहल्याबाईसाहेबांविषयीं आश्चर्य वाटण्यासारखी ही मोठी विलक्षण गोष्ट आहे कीं, त्या सांप्रत राज्यकारभारांत पडल्या होत्या व आपल्या प्रजेस आपली राज्यव्यवस्था सुखावह होण्याविषयीं अविश्रांत मनानें आणि शरीरानें श्रम करीत होत्या तरी त्यांच्या पूर्वींच्या वर्तनक्रमांत कधीं किंचित्‌ही अंतर पडलें नाहीं. प्रातःकालीं उठून स्नान व देवपूजा करणें, पुराण ऐकणें, ब्राह्मणांस दानें देणें, व धर्मांत सांगितलेलीं व्रतें व उपास वगैरे करणें या संबंधानें त्यांचा चाललेला क्रम जो पूर्वीं वर्णिलेला आहे त्याप्रमाणेंच या वेळींही अबाधित चालू असे. पति वारल्यानंतर पांढरें वस्त्र परिधान करण्याचा जो त्यांनीं नियम केला होता तोही त्यांजकडून सुटला नाहीं. हें त्यांचें पांढरें वस्त्र इतकें साधें असें कीं, त्यास एकादी जरीची किनारी देखील नसे. मग अंगावर एकादा

अलंकार वगैरे घालण्याची गोष्ट कशास पाहिजे ? त्या नित्य दुपारचे दोन वाजले ह्मणजे दरबारांत जात व तेथें सायंकाळचे सहा वाजत तोंपर्यंत सरकारी कामकाज पाहात. पुनः रात्रीं नऊ वाजल्यापासून अक्रा वाजत तोंपर्यंत जाग्या राहून भानगडींच्या कामांचा विचार व राज्यसंबंधाचा पत्रव्यवहार वगैरे करीत. राज्यकारभार हातीं घेतल्यापासून दुपारीं तासभर वामकुक्षि व रात्रीं अक्रांपासून पहाटेस चार वाजत तोंपर्यंत निद्रा हीच काय ती त्यांस विश्रांति. कधीं कधीं तर निकडीच्या सरकारी कामामुळें व उपोषणाच्या दिवशीं धर्मशास्त्रांत सांगितलेल्या जागरणामुळें तीही अंतरत असे. पण त्यामुळें नित्याच्या राज्यकारभारांत त्यांच्याकडून कधीं हयगय होत नसे.

इतका वेळ आह्मी आपल्या चरित्रनायिकेच्या सुव्यवस्थित व न्यायी अशा राज्यपद्धतींतील प्रधान अंगांचें विवेचन केलें; तरी याहून तिच्यांत दुसऱ्या पुष्कळ बारीकसारीक चांगल्या गोष्टी आहेत त्यांचें किती जरी वर्णन केलें तरी त्या संपणार नाहींत. मात्र इतकेंच सांगतों कीं, आजपर्यंत जे जे कोणी सदाचारी, न्यायी व प्रजापालनदक्ष असे भूपति या भूतलावर परमेश्वराच्या कृपेनें अवतीर्ण झाले असतील त्यांच्या मालिकेंत ती स्त्री असतांही जाऊन बसण्यास सर्वांशीं योग्य होती. जें हें तिच्या राज्यपद्धतीचें आह्मी वर्णन करीत आहों तें फाजील व अतिशयोक्तीचें आहे अशी जर कोणास शंका येत असेल तर त्यांस आमचें इतकेंच सांगणें आहे कीं ही सर्व हकीकत या भागाच्या आरंभीं ज्यांचें नांव निर्दिष्ट केलें आहे त्या मालकम

साहेबांच्या मध्यहिंदुस्थानच्या इतिहासांतून आह्मी घेतली आहे. तेव्हां तिजविषयीं संशय घेणें नको. राज्यशकट सुयंत्रित हा-कण्यास या साध्वीचें मन आणि शरीर हीं दोन्हीं कशीं समर्थ झालीं याचें त्या थोर इंग्रज गृहस्थांस प्रथम मोठें आश्चर्य वाटलें पण शेवटीं अनेक आधारावरून तिच्या राजकार्यधुरंधरत्वाविषयीं त्यांच्या मनाची पूर्ण खातरी झाल्यावर परकीयभाव त्यांच्या मनांतून एकदम नाहींसा होऊन तिचें त्यांस अत्यंत कौतुक वाटलें. तिची राज्य चालविण्याची पद्धति ह्मणजे निःपक्षपात न्यायाचें माहेरघरच असें होळकरांच्या सर्व प्रजेनें ठरविलें आहे, व डोंगरांत राहाणारे रानटी लोक तिनें दिलेले ह-कांचा उपभोग घेऊन त्यांत पूर्ण समाधान मानून आहेत. तिच्या कारकीर्दींत तिच्या अधिकारांत असलेल्या प्रातांत कधीं दंगा-धोपा उद्भवला नाहीं व रयतेवर अधिकाऱ्यांकडून जुलूम वगैरे झाला नाहीं हीं तिच्या न्यायी कारकीर्दीचीं उत्तम प्रमाणें होत, व ती राज्य चालवीत असतां तिच्या राज्यांतले सर्व लोक भरभराटीस चढले ही तिच्या लोकोत्तर प्रजावात्सल्याची साक्ष होय. होळकरांच्या प्रजेंत तिचें नांव एकाद्या साधुसंताच्या नांवाप्रमाणें पूज्य होऊन बसलें आहे याचें कारणही तिची उत्तम राज्यव्यवस्था व धर्मवासना असेंच ह्मटलें पाहिजे. राज्यांत विद्यावृद्धि करणें व कलाकौशल्यास उत्तेजन देणें हीं देशोन्नतीचीं मुख्य साधनें होत; पण त्याविषयीं तिच्या वृत्तांतांत कोठें आधार न मिळाल्यामुळें आह्मी त्याचें वर्णन करण्याच्या भरसि पडून तिची फाजिल प्रशंसा करीत नाहीं.तरी आमचें मन आमची खात्री करूं शकतें कीं जिनें दानधर्मांत व लौकिककृत्यांत कोट्यावधि रुपये खर्च केले तिच्या हातून अशा आवश्यक

गोष्टींची खचित हेळसांड झाली नसावी. हीं कृत्यें करण्यास पुष्कळ काळ लागतो, तितका तिच्या कारकीर्दींत मिळाला नसल्यामुळें ती प्रचारांत आलीं नाहींत. व जरी कांहीं आलीं असलीं तरी तिच्यामागून होळकरांच्या राज्यांत बहुत कालपर्यंत झोटिंगपाच्छाईचा अम्मल गाजला गेल्यामुळें तीं त्यांत नष्ट झालीं असावीं असें आह्मांस वाटतें. अथवा धर्मकृत्यांत आणि त्रासदायक राज्यकारभारांत तिचें सर्व आयुष्य निघून गेल्यामुळें जरी तिचें या कृत्यांकडे दुर्लक्ष झालें असलें तरी त्यामुळें तिच्या राज्यपद्धतीच्या चांगुलपणास यत्किंचितूही दूषण येत नाहीं. मालकम साहेबांनीं तिच्या सर्व राज्यपद्धतीचें वर्णन केल्यावर शेवटीं म्हटलें आहे ' ऐहिक कृत्यें करतांनां शेंवटीं ईश्वरास जाब द्यावा लागेल अशी दृढबुद्धि ठेवणें यापासून कसें अनुभवसिद्ध लाभ होतात या गोष्टींचें अहल्याबाई ध्यानांत ठेवण्याजोगें उदाहरण आहे. ' आमच्या चरित्रनायिकेविषयीं हा परक्याचा अभिप्राय तिजसंबंधाच्या आमच्या लेखाची सबळता वाचकांस दाखवील व तिजविषयीं त्यांच्या मनांत अभिमान उत्पन्न करील अशी आमची खात्री आहे.

भाग अकरावा समाप्त.

# भाग १२ वा.

## परराज्यांशीं वर्तणूक.

मागील भागांत अहल्याबाईसाहेबांनीं आपल्या राज्याची अंतर्व्यवस्था कशी राखिली होती याचें वर्णन केलें. आतां या भागांत त्यांचें परकीयराजांशीं वर्तन कसें होतें तें पाहूं.

परकीय राजे या सदराखालीं त्यांच्याशीं मांडलिक या नात्यानें राहणारे राजे आणि स्वतंत्र असून त्यांच्याशीं व्यवहार ठेवणारे राजे या दोहोंचाही आह्मी समावेश करितों. त्या वेळेस होळकरांस खंडणी देऊन त्यांच्या अधिकाराखालीं राहणारीं रजपूत लोकांचीं व नर्मदेच्या कांठचीं गोंड लोकांचीं पुष्कळ संस्थानें असत. त्या सर्वांशीं बाईसाहेबांचें वर्तन मोठ्या नेकीचें असे. आपल्या सामर्थ्याच्या जोरावर त्यांनीं त्यापांशीं ठरलेल्यां खंडणी पेक्षां अधिक खंडणी कधीं मागितली नाहीं; यामुळें त्यांच्या कडून ती येण्यास प्रायः विलंब लागत नसे. आणि तसा कधीं लागल्यास त्या त्यांस कडक पत्रें लिहून त्यांत त्यांचा अन्याय असा स्पष्ट करून दाखवीत कीं त्यापासून ते शुद्धीवर येऊन ठरलेली खंडणी ताबडतोब पाठवून देत, व विलंब लाविल्या बद्दल त्यांपाशीं क्षमा मागत. बाईसाहेबांची मनापासूनची इच्छा आपल्याप्रमाणेंच त्यांच्याही राज्यांची भरभराट व्हावी अशी असल्यामुळें त्यांना विशेष त्रास न पोंच-

ण्याबद्दल त्या फार खबरदारी घेत, व त्यांच्या अधिकारांचा अपहार करण्याचें कोणी मनांत आणिल्यास त्यास त्या शासन करीत. त्यांनीं आपली राज्यव्यवस्था सुधारून आपल्या रयतेस सुख द्यावें ह्मणून सल्लामसलत देण्याकरितां प्रत्येकांच्या दरबारीं त्यांनीं आपला एकेक हुशार वकील ठेविलेला होता. शिवाय त्या सर्वांनीं संतुष्ट राहावें व आपल्या राज्यास कधीं कोणत्याही प्रकारचा त्रास देऊं नये ह्मणून आपल्या कारकीर्दीत त्यांनीं त्यांस कांहीं विशेष प्रकारचे हक्क दिले होते. बाईसाहेबांच्या अशा उदार स्वभावामुळें व तशाच त्यांच्या विलक्षण प्रकारच्या जरबेमुळें त्यांचे सर्व मांडलिक त्यांच्याशीं इतक्या नम्रतेनें वागत असत कीं, त्यांच्या सर्व कारकीर्दींत त्यांपैकीं एकानें देखील आपल्या अधिकाराची मर्यादा उल्लंघून आपणास त्यांच्या कोपास पात्र करून घेतलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर ते सर्व असें ह्मणत असत कीं, आमच्यावर आपला अधिकार चालवून आह्मांस सल्लामसलत देण्यासाठीं ह्या बाईसाहेब पुष्कळ वर्षेंपर्यंत होळकरांच्या राज्यावर राहोत.

या वेळीं सर्व हिंदुस्थानांत पुणें, म्हैसूर, हैदराबाद, नागपूर, बडोदें, ग्वाल्हेर, भरतपूर, दिल्ली, लखनौ, व कलकत्ता इतकीं स्वतंत्र राज्यें होतीं. या सर्वांशीं बाईसाहेबांचा पत्रव्यवहार होत असून तो ब्राह्मणांच्या द्वारें होत असे. आपल्या सासऱ्याच्या वेळीं त्यांच्याशीं जे मित्रत्वाचे तहनामे झालेले होते तेच त्यांनीं पुढेंही पाळले, व ते कायम राखण्याकरितां प्रत्येक ठिकाणच्या राजदरबारीं नेहमीं त्यांचा वकील राहात

असे. तथापि झालेल्या तहनाम्यांचें कोणी उल्लंघन करून आपल्या राज्याविषयीं भलता विचार मनांत आणिल्यास त्यास आपलें सामर्थ्य माहीत असावें, व त्यापासून आपल्या प्रजेस आणि स्वतंत्रतेस धक्का पोचूं नये ह्मणून आपल्या पूर्ण विश्वासाच्या अशा जंगी दोन फौजा एक उत्तरहिंदुस्थानांत व एक दक्षिणेंत त्यांनीं ठेविलेल्या होत्या. पण सुदैवेंकरून त्यांचा उपयोग करण्याचा त्यांस कधीं प्रसंग आला नाहीं. कारण, भूतदया, औदार्य, व नीतीनें प्रजापालन इत्यादि लोकोत्तर सद्गुणांविषयीं बाईसाहेबांची कीर्ति सर्वत्र पसरलेली असल्यामुळें त्यांच्या अधिकाराचा अपहार करण्यांत यश मिळेल असें कोणासही वाटत नव्हतें. एक वेळ मात्र उदेपूरच्या अळशी राण्याच्या जातभाईनीं होळकरांच्या ताब्यांतील रामपुरा परगणा बळकाविण्याचा प्रयत्न केला होता व त्यांस त्या राण्यानें मदतीकरितां फौज दिल्यावरून त्यांनीं त्यास वेढा दिला. बाईसाहेबांस हें वर्तमान कळतांच त्यांची खोड मोडण्या करितां त्यांनीं आपल्या पाहाऱ्यावरच्या शरीफभाई नांवाच्या मुख्य अधिकाऱ्यास लागलीच बरोबर फौज देऊन रवाना केलें. मग मंदोसरापासून बारा कोसावर दोन्ही सैन्यांची चकमक झडून शरीफभाईनें राण्याच्या सैन्याचा पराजय केला, तेव्हां त्या राण्यानें अहल्याबाईसाहेबांपाशीं क्षमा मागून तहाचें बोलणें लाविलें व तें त्यांनीं मान्य केलें.

सर्व स्वतंत्र संस्थानिकांमध्यें बाईसाहेबांचें महादजी शिंद्याशीं मोठें सख्य असे, व आपल्या राज्याची अंतर्व्यवस्था उत्तम रीतीनें ठेवण्यांत त्यांनीं त्याच्या सामर्थ्याचा व शहाणपणाचा चां-

गला उपयोग करून घेतला. वास्तविक ह्मटलें ह्मणजे त्या वेळीं सर्व मराठेमंडळामध्यें महादजीसारखा पराक्रमी व राज्यकारस्थानी पुरुष कोणी देखील नव्हता पण त्याच्या अंगीं महत्वाकांक्षेचा अनिवार दुर्गुण जडलेला असल्यामुळें त्याच्या पराक्रमापासून मराठ्यांच्या राज्यास नफ्यापेक्षां नुकसानच अधिक भोगणें भाग पडलें.

तरी बाईसाहेबांच्या संबंधानें त्याचें वर्तन चांगलें होतें. आतां हें खरें आहे कीं, त्यानें त्यांच्यापासून एकदा तीस लक्ष रुपये उसनवार ह्मणून घेतले होते व त्या रकमेची फेड त्यानें केली किंवा नाहीं याविषयीं जरी कोठें उल्लेख मिळत नाहीं तरी त्या कर्जाच्या फेडीपेक्षां तो त्यांस अधिक उपयोगी पडला यांत संशय नाहीं. कारण होळकर आणि शिंदे यांचा मुलूख एकमेकांत फार मिसळलेला असल्यामुळें उभय राज्यांत नेहमीं कुरापती उत्पन्न होऊन प्रसंगीं लढाई जुंपण्याचाही योग येत असे; पण त्या दोघांत परस्पर स्नेहसंबंध चांगला असल्यामुळें तो टळत असे. अहल्याबाईसारख्या उत्तम स्त्रीस साह्य केलें असतां त्यापासून आपला नांवलौकिक मोठा होईल व तोच तिच्यापासून द्रव्य घेण्यापेक्षां अधिक फायदेशीर आहे असें त्या दूरदृष्टीपुरुषास वाटत असे आणि म्हणूनच त्यानें आपल्या अमीन लोकांस व इतर मुलकी आणि लष्करी कामगारांस सक्त असा हुकूम देऊन ठेविला होता कीं, अहल्याबाईसाहेबांचें कोणतेंही काम आलें असतां तें करण्यास तुह्मीं विलंब करीत जाऊं नये.

महादजी शिंद्याप्रमाणेंच दुसऱ्या सर्व स्वतंत्र संस्थानिकांचा

बाईसाहेबांविषयीं चांगला ग्रह असे. त्यांचे यजमान श्रीमंत पेशवे यांस तर त्यांच्या उत्तम राज्यव्यवस्थेचा व परोपकारबुद्धीचा मोठा अभिमान वाटत असे व ते त्यांचा योग्य सन्मान ठेवीत. आणि आश्चर्य हें कीं, जसा पेशवे ठेवीत तसाच म्हैसुरचा टिप्पुसुलतान, हैदराबादचा निजाम, कलकत्त्याचा गव्हरनर व लखनौचा नबाब हेही ठेवीत. व त्यांची निरंतर भरभराट होण्याविषयीं इच्छा करीत. मुसलमान वगैरे परकीय राजांची जर त्यांच्या विषयीं इतकी पूज्यबुद्धि होती तर ती स्वकीय हिंदुराजांची किती चांगली असली पाहिजे याचें अनुमान सहज होतें. सर्व हिंदुराजे त्यांच्याशीं वैर करणें अथवा त्यांजवर कोणी चालून आल्यास त्यांच्या साह्यास न जाणें हें गोहत्येसारखें पातक समजत असत, व त्यांच्या उपयोगीं पडण्याचा कधीं प्रसंग आल्यास तो आपणास मोठा पुण्यलाभ झाला असें समजून त्या कामांत अतिशय उत्साह प्रकट करीत. त्यांच्या आंगच्या लोकोत्तर सद्गुणांमुळें त्यांच्या विषयीं सर्वांच्या ठायीं जो असा उत्तम ग्रह होऊन राहिला होता, तो सृष्टिनियमाप्रमाणें स्वाभाविकच होता तेव्हां त्याबद्दल त्या राजांची कांहीं तारिफ करावयास नको.

परकीय राजांच्या अंतःकरणांत बाईसाहेबांविषयीं जी पुज्य, बुद्धि उत्पन्न झाली होती तिचें हेंही एक विशेष कारण असावेंसें आह्मांस वाटतें कीं, या आपल्या हिंदुस्थानदेशांत पुष्कळ क्षेत्रें असल्यामुळें प्रत्येक राजांच्या अधिकारांत त्यांतील कांहींना कांहीं तरी होतीं. या प्रत्येक क्षेत्राचे ठायीं कोठें देऊळ, कोठें धर्मशाळा, कोठें विहीर, कोठें तळें वगैरे त्यांनीं धर्मकृत्यें केलीं

असल्यामुळें ही साध्वी स्त्री आपल्या राज्यांतील प्रजेप्रमाणें व देवस्थाना प्रमाणें दुसऱ्याच्या राज्यांतील प्रजेविषयीं व देवस्थानांविषयीं ज्याअर्थी इतकी काळजी घेते त्याअर्थी तिच्याठायीं आपपरभाव नाहीं असा त्यांचा ग्रह झाला असावा. व तो तसा होणें कांहीं वावगें नाहीं.

तुकोजी होळकर दक्षिणेंत गेल्यापासून पुढें वीस वर्षांचा काल लोटेपर्यंत अहल्याबाईसाहेबांनीं केवळ आपल्या बुद्धिसामर्थ्यानें होळकरांचा राज्यशकट सुरळीतपणें हाकिला व आपल्या कारकीर्दींत प्रजेस न्याय आणि दया यांचें पूर्ण सुख अनुभवायास लाविलें. त्यांची राज्यपद्धति कशी सरळ रीतीचीव सुखावह होती हें मागेंच सांगितलें आहे. त्या प्रकारचेंच त्यांचें आपल्या बरोबरीच्या परकीय राजांशींही सरळ वर्तन आमरण होतें. त्यांचा अधिकार होता तोंपर्यंत होळकरांच्या स्वातंत्र्याचा नाश करण्यास परकीय राजांतून कोणालाही धैर्य झालें नाहीं इतकें सांगितलें असतां त्यांनीं आपल्या प्रजेस कसें संतुष्ट राखिलें होतें, व आपल्या सासऱ्याचें सामर्थ्य कसें कायम ठेविलें होतें याची कल्पना सहज करितां येईल. श्रीमंत पेशव्याशीं मल्हाररावांचें जें सेव्यसेवकपणाचें नातें होतें तें त्यांनींही ठेविलें होतें. दुसऱ्या राजांच्या नादीं लागून तें झुगारून देण्याचा विचार त्यांच्या मनांत कधीं आला नाहीं. त्यांच्या एकनिष्ठ स्वामिभक्तीविषयीं एवढें एकच उदाहरण दिलें ह्मणजे पुरे आहे कीं, श्रीमंत दादासाहेब यांस त्यांच्या कारभाऱ्यांनीं त्यांनीं ब्रम्हहत्या करून मिळविलेल्या पेशवाईच्या गादीवरून पदच्यूत केल्यावर ते मदतीची भिक्षा मागत मागत बाईसाहेबांपाशीं आले; तेव्हां त्यांनीं त्यांस असें चोख उत्तर

दिलें कीं, मी तुह्मांस या अन्यायाच्या कामांत साह्य तर करणार नाहींच, पण माझ्या राज्यांत यापुढें राहिलांत तर माझ्या यजमानांचे शत्रु ते माझेच शत्रु असें समजून तुह्माला कैदेंत मात्र ठेवीन. या त्यांच्या जबाबावरून त्या पेशव्यांस किती मानीत होत्या हें चांगलें समजतें. तरी शिंदे, गायकवाड वगैरे आपल्या बरोबरीचे त्यांच्या पदरचे संस्थानिक आपला उत्कर्ष होण्याकरितां जसा प्रयत्न करीत तसा त्याही करीत असत, व ज्यावर ते स्वामित्वाचा सारखा हक्क ठेवूं इच्छीत त्यावर त्याही तसाच सांगत. सारांश, बाईसाहेबांच्या कारकीर्दींत पेशव्यांचे दुसरे सरदार जसें आपलें स्वातंत्र्य संभाळून होते त्याप्रमाणेंच त्याही होत्या, व त्यांच्या मरणापर्यंत तें यत्किंचित्ही कमी झालें नाहीं. त्यांच्या पश्चात् होळकरांच्या राज्याची अव्यवस्था झाली व उत्तरोत्तर त्यांच्या स्वतंत्रतेचा जो ऱ्हास होत गेला त्याचीं कारणें काय असतील तीं असोत, त्यांचा आह्मी येथें विचार करीत नाहीं; मात्र इतकेंच सांगतों कीं, त्याला बाईसाहेबांची राज्यपद्धति मुळींच कारण नाहीं.

भाग बारावा समाप्त.

# भाग १३ वा.

## औदार्य आणि स्वभाव.

या आर्यावर्तांतील असंख्य लोकांचीं पातकें आपल्या पवित्रजलानें नाशाप्रत नेल्यामुळें, गंगा, यमुना, सरस्वती इत्यादि महानद्यांची कीर्ति आज हजारों वर्षें जशी सर्व जगभर पसरून राहिली आहे तद्वतच श्रीमंत अहल्याबाईसाहेब यांचें नांव, त्यांनीं आपल्या अद्वितीय औदार्यानें अनेक जनांचीं दुःखें हरण केल्यामुळें सर्वत्र पूज्य होऊन राहिलें आहे. या त्यांच्या औदार्याचें समग्र वर्णन करण्यास आह्मी असमर्थ आहों; कारण, होळकरांच्या सर्व खजिन्यावर, त्याचा दानधर्माकडे विनियोग करण्याचा निश्चय करून हातांत तुळशीपत्र घेउन ब्राह्मण संकल्प सांगत असतां ज्यांनीं पाणी सोडिलें व त्या निश्चयाप्रमाणें त्याचा त्याच सत्कृत्याकडे व्यय केला त्या अहल्याबाईसाहेबांच्या औदार्याच्या ज्या लहानमोठ्या पुष्कळ गोष्टी आहेत त्या सर्वांचा समावेश या लहानशा चरित्रांत करतां येण्यास अवकाश नाहीं व शिवाय त्यांची खरी माहिती मिळणें शक्यही नाहीं. यासाठीं त्यांतील कांहीं ठळक ठळक गोष्टी मात्र आह्मी येथें सांगतों.

हिंदुस्थानांतल्या प्रत्येक तीर्थाचे ठिकाणीं बाईसाहेबांनीं धर्मशाळा, अन्नछत्र व देवस्थानास वर्षासन वगैरे जीं सत्कृ-

त्यें केलीं आहेत त्यांची हकीकत त्यांच्या तीर्थयात्राप्रसंगीं दिलीच आहे. त्याशिवाय त्यांच्या थोरपणाचीं मोठीं व चिरकालिक स्मारकें ह्मटलीं ह्मणजे महेश्वर येथें रेवानदीस घांट बांधून त्यावर जी त्यांनीं आपली भव्य छत्री उभारली आहे व गयेस ज्या अनेक चांगल्या चांगल्या इमारती बांधिल्या आहेत हीं होत. या दोन्ही ठिकाणीं लोकांस त्यांची सदैव आठवण राहण्याकरितां संगमरवरी दगडाच्या त्यांच्या प्रतिमा बसविल्या आहेत त्यांचें दर्शन तेथें जाणारे येणारे लोक आपल्या देवतेप्रमाणें मोठ्या भक्तिभावानें घेऊन आपणास कृतार्थ मानितात. महासाधु कबिरांनीं 'नर करणी करे तो नरका नारायण होय.' असें ह्मटलें आहे त्याचें प्रत्यक्ष उदाहरण अहल्याबाईसाहेब होत असें ह्मटल्यावांचून आमच्यानें राहावत नाहीं. फार काय सांगावें मानवयोनींत जन्म घेऊन आपल्या लोकोत्तर सद्गुणांनीं व अखंड औदार्यानें त्यांनीं आपलें नांव देवादिकांच्या मालिकेंत गोवून घेतलें त्यामुळें जातीच्या धनगर असून ब्राह्मणांसही त्या वंद्य झाल्या आहेत.

परशत्रू पासून आपल्या राज्याचें उत्तम रीतीनें रक्षण आपणांस करितां यावें ह्मणून पुष्कळ पैसा खर्च करून सरहद्दीवर ठिकठिकाणीं त्यांनीं किल्ले बांधिले. तसेंच आपल्या अधिकारांतील लोकांस सुख व्हावें ह्मणून सर्व नद्यांस घांट बांधून सर्वत्र सडका, धर्मशाळा, विहिरी, तलाव, व देवळें यांची रेलचेल केली. या सर्वांत नेमावरगांवीं त्यांनीं बांधिलेलें खंडोबाचें देऊळ व जामच्या किल्ल्याचापाशीं जो विंध्यपर्वताचा केवळ कडा उतरला आहे तेथें बांधिलेला

वांट हीं दोन्ही कामें अत्यंत प्रेक्षणीय झालीं आहेत, व त्यांस किती खर्च लागला असावा याचें अनुमानही करितां येत नाहीं. हा व इतर धर्मसंबंधीं इमारतींचा सर्व खर्च त्यांनीं आपल्या शिल्लक असलेल्या पैशांतून केला. त्याबद्दल लोकांवर किंचित्‌ही अधिक कर बसविला नाहीं; यासाठींच त्यांचीं हीं कृत्यें आह्मी परोपकाराचीं समजतों. लोकांजवळून कराच्या रूपानें पैसा उकळून त्यानें त्यांच्या सोईचीं कामें करणें हीं कृत्यें परोपकाराचीं समजून तीं करणाराची जे कोणी प्रशंसा करीत असतील ते खुशाल करोत. आह्मी तर तीं कृत्यें ह्मणजे कावेबाजपणाची एक राज्यपद्धति असें समजतों.

बाईसाहेबांचीं औदार्याचीं कृत्यें त्यांच्या अंतःकरणांत उद्भवलेल्या लोकोत्तर भूतदयेचा परिणाम होत, आणि ह्मणूनच तीं त्यांच्याच केवळ राज्यामध्यें नसून हिंदुस्थानांतील साऱ्या भागांत पसरलीं आहेत. त्यांतलीं जीं चिरकालिक आहेत त्यांचें वर्णन वर आलेंच आहे. आतां दुसरीं त्यांचीं धर्मकृत्यें खर्चाचीं असून त्यांच्या हयातीनंतर नाममात्र राहिलीं अशीं पुष्कळ आहेत. त्यांपैकीं सर्वांत मोठें ह्मणजे इसवी सन १७९० च्या सुमारास उत्तरहिंदुस्थानांत जो भयंकर दुष्काळ पडला होता त्यांत सांपडलेल्या मनुष्यांचें प्राण रक्षण हें होय. या दुष्काळाचें स्वरूप इतकें भयंकर होतें कीं, त्यावेळीं त्या प्रांतांत रुपयाला पायलीपेक्षां अधिक धान्य मिळत नव्हतें, व तेथें बळी तो कान पिळी असा प्रकार चालू असल्यामुळें गरीब लोकांस त्याचाही लाभ होणें अशक्य झालें होतें. त्या वेळीं त्या प्रांतांतील सर्व लोक बाईसाहेबांच्या राज्यांत येऊन

राहिले असतां त्यांनीं त्यांस अन्नवस्त्र पुरवून त्यांचा योग्य समाचार घेतला. खचितच त्या वेळीं बाईसाहेबांसारखी उदार व दयार्द्र अंतःकरणाची स्त्री त्या दुष्काळपीडित लोकांचें संरक्षण करण्यास मिळाली नसती तर अन्न अन्न करून त्यांनीं आपले प्राण पटापट सोडिले असते !

अहल्याबाईसाहेब नित्य सहस्र ब्राह्मणांस गोप्रदानें देत असत; तसेंच जे गरीब लोक होते त्यांस शिधा व वस्त्रें वांटीत असत. त्यांचेकडे आलेला कोणीही याचक कधीं विन्मुख ह्मणून गेलाच नाहीं. शिवाय अत्यंत नीच जातीचे जे लोक होते त्यांस प्रत्येक सणावाराच्या दिवशीं त्यांच्याकडून उत्तम पक्वान्नांची वाढणीं मिळत असत. आंधळे, पांगळे, लुले, अशा लोकांचा त्या फार चांगला समाचार घेत. बैरागी, गोसावी, वगैरे लोकांविषयीं त्यांच्या अंतःकरणांत पूज्यबुद्धि असून त्यांच्या निर्वाहाची तजवीज त्यांनीं चांगली करून दिली होती. उष्णकाळांत त्यांनीं ठिकठिकाणीं आपले नौकर ठेविले असून ते तृषित झालेल्या वाटसरांस पाणी पाजण्याकरितां तयार असत. त्याचप्रमाणें शीतकाळाच्या आरंभीं सर्व जातींच्या गरीब लोकांस वस्त्रें वांटण्याकरितां त्यांच्या पदरचे कारकून फिरत असत. सारांश, त्यांचीं अशीं अनेक तऱ्हांचीं औदार्याचीं कृत्यें पाहून त्या वेळीं साक्षात् भूतदयाच अहल्याबाईसाहेबांच्या रूपानें माळव्यांत येऊन राहिली आहे कीं काय असें पाहणारास वाटत असे.

तरी एवढ्यानेंच या भूतदयेचा कळस झाला असेल असें कोणी समजूं नये. सर्व मनुष्यें जशीं त्यांच्या औदार्यास

पात्र झालीं त्याप्रमाणेंच शेतांत काम करणारे बैल, रानांत फिरणारे पक्षी व नदींत राहणारे मच्छादि जलचर प्राणी यांनाही त्याचा लाभ झाला. उष्णकाळांत शेताची जमीन नांगरीत असतां असें वारंवार दृष्टीस पडे कीं, बाईसाहेबांचे नौकर लोक तेथें पाण्याचीं भरलेलीं भांडीं घेऊन धांवत येत, व शेतकरी बैलांस पाणी पाजण्याकरितां आपले बैल थांबवीत. रानांत शेतकरी लोक पक्षांना हांकून लावतात ह्मणून केवळ त्यांच्याचकरितां त्यांनीं निराळीं शेतें राखून ठेविलीं होतीं. त्यामुळें तेथें सर्व प्रकारचे पक्षी आपलें भक्ष्य खाण्याकरितां नित्य जमत, व त्या वेळीं एकाद्या पसरलेल्या भिन्नभिन्न लोकांच्या सैन्याप्रमाणें त्यांची मौज दुरून दिसत असे. नद्यांतील माशांस खाऊं घालण्याकरितां त्या दररोज पिठाच्या पुष्कळशा गोळ्या तयार करवीत व त्यांत रामनामाच्या चिठ्या घालून नंतर त्या नदींत टाकीत. बाईसाहेबांच्या या पद्धतीचें अद्यापही त्या प्रांतांतील लोकांनीं अनुकरण केलेलें पाहण्यांत येतें. महेश्वर वगैरे ठिकाणीं अशा रामनामांकित पिठाच्या गोळ्या करून तेथील रहिवासी लोक नर्मदेवर येतात व त्या नदींत टाकून माशांची उड्या मारण्याची मौज पाहतात.

अहल्याबाईसाहेबांच्या वेळीं प्रख्यात असलेला प्रभाकर कवि यानें त्यांच्यावर एक फार चांगला पोवाडा केलेला आहे, त्यांत तो असें ह्मणतो कीं, बाईसाहेबांसारखी धन्य माउली कलियुगांत एक देखील झाली नाहीं. त्यांनीं अनेक वेळां ब्राह्मणांचीं सहस्रभोजनें घातलीं; सालंकृत अशा हजारों गाई दान केल्या. त्यांच्या आश्रयाखालीं महेश्वरास शेंकडों यज्ञकुंडें नेहमीं पेटलेलीं अ-

सून त्यांत ब्राह्मण अवदानें टाकीत होते. तसेंच त्यांनीं पुष्कळ तैलंग लोकांचीं लग्नें आपल्या खर्चानें करून देऊन नवरानवरींच्या वराती मोठ्या थाटानें मिरविल्या. तान्ह्या बालकांस त्यांनीं दूध पुरवलें. जे म्हातारे रोगी होते त्यांस औषधें व वस्त्रें मिळण्याची व्यवस्था करून दिली. ज्यांनीं अग्निहोत्रें घेतलीं होतीं त्यांस तीं नेहमीं चालवितां येतील अशी मठ बांधून सोय लावून दिली. याशिवाय त्या सदा स्वधर्मांतलीं सांगितलेलीं व्रतें करण्यांत गर्क असत. नित्य ब्राह्मणांस इच्छाभोजन घालीत. कधीं कोटिलिंगें करीत; नित्य पुराण ऐकत व हातांत जपमाळ घेऊन जप करीत. कोणी यात्रेकरू आले असतां कोणांस पंचे कोणांस जोडे कोणांस अंगरखे देऊन मार्गस्थ करीत. गरीबलोकांच्या यात्रेचा सर्व खर्च आपण देत. ग्रहणांच्यावेळीं व इतर पर्वणींच्यावेळीं कधीं तेलातुपाच्या कधीं गूळतिळाच्या व कधीं सोन्यारुप्याच्या आपल्या तुला करून त्या ब्राह्मणांस वांटीत असत. त्यांच्या दानधर्मास मर्यादा म्हणून कशी ती राहिलीच नव्हती. कोणी स्वतःच्या लग्नाकरितां, कोणी आपलें कांहीं व्रत उजविण्याकरितां, कोणी आपण बांधिलेल्या देवळास सभामंडप बांधून तेथें नंदादीप लावण्याकरितां अशा कोणत्याना कोणत्या तरी निमित्तानें नित्य त्यांच्याकडे येत व या उदारशील बाईसाहेब त्यांस संतुष्ट करून परत लावीत. त्यांची पुण्यकारक कीर्ति त्या वेळीं सर्वत्र पसरून गेली असल्यामुळें एकाद्या साधूच्या दर्शनास जशा लोकांच्या झुंडींच्या झुंडी येतात तशा त्यांच्या दर्शनास येत व त्या योगानें आपलें सर्व पाप नाहींसें झालें असें समजत. बाईसाहेबांनीं आपला लौकिक वाढवून उभयकुळांचा उद्धार केला तसा कोणीही यापूर्वी केला नसेल व पुढेंही कर-

णार नाहीं. प्रभाकर कवीनें स्वतः पाहून त्यांच्या विषयीं जें असें ह्मटलें आहे तें अक्षरशः खरें असलें पाहिजे अशी आमची खातरी आहे.

बाईसाहेबांचीं औदार्याचीं सर्व कृत्यें वर्णू लागलों तर तीं कधींच संपावयाचीं नाहींत, ह्मणून येथेंच हात आखडता घेऊन त्यांविषयीं इतकेंच लिहितों कीं, या उदारबुद्धीच्या महाराणीनें नानाप्रकारच्या धर्मकृत्यांत सुमारें वीस कोटि रुपये खर्चिले आहेत ! आतां हें खरें आहे कीं, एवढी मोठी संपत्ति स्वराज्यांत राहूंद्या, पण परराज्यांतही देवळें, विहिरी, धर्मशाळा वगैरे बांधण्यांत त्यांनीं खर्च केली हें वाचून हल्लीं ज्ञानसंपन्न झालेले आमचे वाचक त्यांस दोष देण्यास तयार होतील व अशा फाजील औदार्यानें त्यांनीं लोकांस आळशी केलें असेंही ह्मणतील. त्याप्रमाणेंच पशू वगैरे ग्राम्य प्राण्यांशींही त्यांचें असलेलें अमानुष भूतदयेचें वर्तन पाहून त्यांस हसूं येईल. आमच्या वाचकांपैकीं ज्यांची अशी समजूत असेल त्यांस, बाईसाहेबांविषयीं पूर्वी मालकमसाहेबांची अशाच प्रकारची समजूत होउन त्यांनीं या अपरिमित दानधर्मासंबंधानें त्यांस दोष दिला त्या वेळीं त्यांच्या पदरच्या एका ब्राह्मणानें साहेब मजकुरांस जें उत्तर दिलें तेंच देतों. तो ब्राह्मण मालकमसाहेबांस ह्मणाला कीं, बाईसाहेबांनीं परकीय राज्यांत इमारती बांधून व अफाट दानधर्म करून आपली सर्व संपत्ति गमाविली असें आपण ह्मणतां, पण या सत्कृत्यांत त्यांनीं जो पैसा खर्च केला त्याच्या दुप्पट जरी लष्कराकडे खर्च केला असता तरी त्यांची प्रजा तीस वर्षेंपर्यंत शांततेचा उपभोग घेती व आज दानधर्मामुळें जितकें

त्यांचें नांव पूज्य झालें आहे तितकें त्यानें झालें असतें असें आपणास वाटतें काय? या ब्राह्मणाच्या भाषणानें मालकमसाहेबांचें जसें समाधान झालें तसें आमच्या वाचकांचेंही होईल अशी आमची खातरी आहे. बाईसाहेबांनीं परराज्यांत व स्वराज्यांत भूतदयेचीं कृत्यें करण्यांत जो एवढा अजस्र खर्च केला तो करण्यांत त्यांच्या जिवाचा लाडका हेतु आपली प्रजा इतर बलिष्ठ राजांपासून निर्भय राहून आपल्या अधिकाराखालीं न्यायानें व आनंदानें आपल्या दौलतीचा उपभोग घेत रहावी हाच होता. या त्यांच्या स्तुत्य उद्देशाबद्दल त्यांची प्रशंसा कोण करणार नाहीं?

यानंतर आह्मी बाईसाहेबांच्या स्वभावाविषयीं दोन शब्द लिहिण्याकडे आपली लेखणी वळवितों. इतर चरित्रकारांची पद्धत चरित्राच्या शेवटीं स्वभाववर्णन करण्याची असते, पण तें येथेंच करणें आह्मांस अधिक प्रासंगिक होईल असें वाटतें. बाईसाहेब आपल्या सर्व प्रजेविषयीं मातेप्रमाणें कळकळ दाखवीत असत, व सर्व प्रकारच्या धर्मकृत्यांत उदारपणानें पैसा खर्च करीत असत. तसेंच कोणा अपराध्यास शिक्षा करणें ती त्याच्या अपराधाप्रमाणें फार सौम्य करीत. ह्या सर्व गोष्टी ज्यांनीं वाचिल्या असतील त्यांस त्या पराकाष्ठेच्या दयाळु असल्या पाहिजेत याबद्दल कधीं संशय वाटणार नाहीं. त्या अंगानें फार उंच नव्हत्या व फार ठेंगण्याही नव्हत्या त्यांचा बांधा सडपातळ असून जरी अनेक संसारिक दुःसह दुःखांमुळें त्यांचें अंतर्याम उदास झालेलें होतें तरी त्यांचा चेहरा सदा आनंदित दिसे. आपल्या पदरच्या सर्व अधिकारी व

नौकर लोकांस त्या मोठ्या ममतेनें वागवीत; तरी एकादे वेळीं त्यांस राग आला असतां त्या इतकें उग्र स्वरूप धारण करीत कीं, त्यांच्या अगदीं सलगीच्या मंडळींपैकीं देखील कोणास त्यांच्या जवळ जाण्यास धैर्य होत नसे. या शिवाय त्यांस असत्याचा इतका तिटकारा असे कीं, तसें भाषण करणाऱ्या मनुष्यावर एक वेळ त्यांची गैरमर्जी झाली कीं त्यांना प्रसन्न करून घेण्याची कधीं त्यानें आशाच करूं नये. तसेंच त्या जात्या स्त्री असतांही त्यांच्या ठायीं अमानुष धैर्य होतें; यामुळें कसलेंही संकट आलें तरी न डगमगतां त्या त्याचें निवारण करीत. मल्हारराव होळकरांची सून ह्मणवून घेण्याचा त्यांस मोठा अभिमान असे ह्मणून त्यांस कांहीं कृत्य करणें झाल्यास दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी न पितां तें त्या आपल्या स्वतःच्या हिमतीवर करीत.

ब्राह्मणांविषयीं बाईसाहेबांच्या अंतःकरणांत अत्यंत पूज्यबुद्धि असून त्यांच्यावर त्यांनीं आपला सर्व विश्वास टाकिला होता. परराज्याशीं पत्रव्यवहार, वसुलाचा जमाखर्च व दानधर्माच्या पैशाचा विनियोग इत्यादि सर्व गोष्टी त्या त्यांच्याकडून करवीत. ब्राह्मणांनींही या त्यांच्या विश्वासाचा कधीं दुरुपयोग केला नाहीं.

गोब्राह्मणप्रतिपाल करण्याविषयीं सर्व हिंदु राजांस आपल्या धर्मशास्त्राचीच आज्ञा असल्यामुळें बाईसाहेबांनीं जसें ब्राह्मणांचे संरक्षण केलें तसेंच गाईचेंही केलें. त्यांच्या राज्यांत कधीं गोवध तर झाला नाहींच; पण परराज्यांतही तो न

होऊं देण्याविषयीं त्यांनीं पुष्कळ काळजी घेतली. सर्व देवांच्या ठायीं त्यांचा सारखा भाव असे, व एकाच परमेश्वराच्या या सर्व विभूति आहेत असें समजून सर्वांची त्या नेहमीं भक्ति करीत व दर्शन घेत.

परोपकारार्थ द्रव्य खर्च करणें हें बाईसाहेब जसें आपलें कर्तव्य समजत तसेंच विद्वान् लोकांस आश्रय देऊन त्यांच्या गुणांचें चीज करणें हेंही आपलें कर्तव्य समजत. नित्यशः त्यांच्याकडून मोठमोठे वैदिक, पंडित, शास्त्री यांस शालजोड्या, धोतरजोडे व पागोटीं मिळत आणि गवई, गोंधळी यांस कंठ्या व कडीं बक्षिस मिळत. कधीं कधीं तर त्या विद्वान् व शास्त्री लोकांस आदरपूर्वक पत्रें पाठवून आपल्या भेटीस बोलावीत. प्रसिद्ध विद्वान् कवि मयूरपंडित हे काशीयात्रा करण्यास गेले असतां त्यांच्या विद्वत्तेचा लौकिक ऐकून त्यांची भेट घेण्याकरितां बाईसाहेबांनीं पालखी पाठवून त्यांस मोठ्या समारंभानें महेश्वरास आणिलें व कांहीं दिवस त्यांस आपल्या संनिध ठेवून घेऊन व त्यांच्या विद्वत्तेप्रमाणें त्यांचा मोठा गौरव करून त्यांस दक्षिणेंत रवाना केलें.

कोणा ही विद्वानाच्या विद्वत्तेविषयीं जसा बाईसाहेब योग्य विचार करीत तसाच त्याच्या व्यावहारिक आचरणाविषयींही करीत व तें चांगलें नसल्यास त्यास तें सुधारण्याविषयीं उपदेश करीत. प्रसिद्ध रंगेल कवि अनंतफंदी हे लहानपणीं मोठे बुद्धिमान् असतांही एका मुसलमान फकिराच्या नादीं लागून तमाशा करीत असत. एके वेळीं ते महेश्वरास येऊन तमाशा

करीत असतां तें वर्तमान बाईसाहेबांस कळल्यावरून त्यांनीं त्यांस आपल्याजवळ बोलावून आणिलें, आणि त्यांस असा उपदेश केला कीं, तुह्मी ब्राह्मण असतां तमाशा करितां हे खचित मोठें पातक करीत अहां; यासाठीं हा निंद्य धंदा सोडून देऊन दुसऱ्या एकाद्या चांगल्या मार्गांत आपल्या विद्वत्तेचा उपयोग करा. बाईसाहेबांचा हा उपदेश लागलाच फंदीबुवांच्या मनांत भरून त्या वेळेपासून त्यांनीं तमाशा करणें सोडून दिलें व चांगल्या कामीं आपल्या बुद्धीचा व्यय करून द्रव्य आणि लौकिक हीं दोन्हीं संपादन केलीं.

बाईसाहेबांस लहानपणीं त्यांच्या पंतोजीकडून थोडेंबहुत शिक्षण मिळालें होतेंच; त्यामुळें तेव्हांपासूनच त्यांस लिहितां वाचतां येत होतें. त्याचा उपयोग त्यांचा भ्रतार निवर्तल्यानंतर त्यांस फार झाला. दिवसाचा बराच वेळ त्या प्राकृत पोथ्यापुराणें वाचण्यांत घालवीत व त्यांचा अर्थ त्यांस चांगला कळत असे. पुढें राज्यकारभारांत पडल्यावर अनेक विद्वान् लोकांशीं त्यांचा सहवास होत गेल्यामुळें त्यांस बऱ्याच संस्कृत शब्दांची माहिती झाली व तिचा त्यांनीं संस्कृतांतलीं न्यायशास्त्रासंबंधीं, राज्यव्यवहारसंबंधीं व धर्मशास्त्रसंबंधीं पुस्तकें पाहून व स्वतः त्यांवर विचार करून चांगला उपयोग केला. आपल्या राज्यांत एकादा कायदा करणें झाल्यास त्या आपल्या कारभाऱ्यांशीं त्यासंबंधानें पुष्कळ वेळां चर्चा करून मग करीत, व त्या वेळीं त्यांचें तें ज्ञान पाहून कारभाऱ्यांस मोठें आश्चर्य वाटे. सारांश, त्यांच्या इतकी ज्ञानसंपन्न स्त्री त्याच्या वेळीं साऱ्या हिंदुस्थानांत कोणीही नव्हती असें ह्मटल्यास आह्मी अतिशयोक्ति करितों असें कोणी ह्मणेल असें आह्मांस वाटत नाहीं.

बाईसाहेबांच्या अंगीं इतके लोकोत्तर गुण असतांही त्यांस किंचित्‌ही गर्व नव्हता ही गोष्ट मानवी स्वभावाच्या पलीकडची समजली पाहिजे. केवळ त्यांना स्वतःला गर्व नव्हता इतकेंच नाहीं, तर त्यांच्या गुणाची कोणी स्तुति केली तर ती देखील त्यांस सहन होत नसे. एकदा एका ब्राह्मणानें त्यांच्या विषयीं स्तुतिपर ग्रंथ लिहून तो त्यांच्या समोर वाचून दाखविला; तेव्हां तो वाचीत असतां मात्र त्या कांहीं बोलल्या नाहींत; पण तो आटोपल्यावर त्या त्या ब्राह्मणास ह्मणाल्या कीं, मी एक मृत्युलोकची पापी स्त्री आहें, हें वर्णन मला मुळींच शोभत नाहीं. तुह्मी ब्राह्मण असून ईश्वरस्तुति सोडून नरस्तुति करावयास लागलां हें मोठें आश्चर्य आहे. असें ह्मणून त्यांनीं तो आत्मस्तुतिपर ग्रंथ आपल्या हातांनीं नर्मदेंत टाकून दिला व त्या ब्राह्मणास त्याबद्दल कांहीं न देतां परत जाण्यास सांगितलें व फिरून त्याची कधीं चौकशी देखील त्यांनीं केली नाहीं. अहल्याबाईसाहेबांच्या या कृत्याबद्दल त्यांची किती तारीफ केली तरी ती थोडीच आहे.

बाईसाहेबांच्या स्वभावाचें येथें इतकेंच वर्णन करून आम्ही हा भाग संपवितों. आणखीं त्याविषयीं आम्हांस कांहीं लिहावयाचें आहे तें या चरित्राच्या शेवटीं लिहूं.

भाग तेरावा समाप्त.

---

## भाग १४ वा.

### शेवटचें भयंकर दुःख.

:o:

वाचकहो, प्रवास करण्यास अति दुःसह असा पर्जन्यकाल आला असतां त्यांतच प्रवास करणें दुर्दैवानें तुह्मांस भाग पडल्यास पावसाच्या सरी मागून सरी तुम्हांस आपल्या अंगावर घेतल्याच पाहिजेत. मग त्यांत घटकाभर आनंददायक सूर्यप्रकाश पडून त्यानें तुमच्या चित्तास उल्हास प्राप्त झाल्यास तुमचें नशीब. तरी तेवढी घटका लोटल्यावर त्या कालांतील परमेश्वराच्या नियमाप्रमाणें पुनः पावसाची मुसळधार पडून ती तुमचा तो सर्व उल्हास तत्क्षणीं लयास नेणार व त्याच्या दुप्पट तुमचें मन उदास करणार. पण निरुपायास्तव तुह्मांस त्याच प्रसंगातून मार्ग क्रमीत गेले पाहिजे. त्याबद्दल तुह्मी किती दुःख केलें अथवा त्रासून परमेश्वरास दोष दिला तरी त्याचा काय उपयोग होणार आहे ? तद्वतच हें आमचें अहल्याबाईसाहेबांचें चरित्र ह्मणजे अनेक दुःखरूप पर्जन्याच्या सरीमागून सरींचा वर्षाव करणारा मेघकालच आहे. हें चरित्र वाचीत असतां प्रथम एकसारख्या दुःखांच्या वर्णनानें भरलेले यांतील भाग तुह्मी मोठ्या कष्टानें वाचिले व तेणें करून तुमच्या मनास अत्यंत उदासीनता आली ; पण सुदैवानें त्या मेघकालांतील सूर्यप्रकाशाच्या दर्शनाप्रमाणें त्या दुःखांच्या भागांपुढले

थोडेसें—सुखाचे तर नाहींतच—पण दुःखवर्णनविरहित असे भाग तुमच्या दृष्टीच पडतांच तुह्माला पुनः उमेद आली व ते मोठ्या उत्कंठेनें तुह्मी वाचून प्रथम आपल्या मनास आलेला शीणही नाहींसा केलात. पण हें चरित्रच जर मूळचें दुःखरूप व हृदयद्रावक आहे तर तें पुनः तुह्मांस दुःखवर्णनाच्या भागाचे दर्शन देऊन ती तुमची क्षणिक उमेद नाहींशी केल्याशिवाय कसें राहिल? पण तसें झालें तरी करावयाचें काय? विधात्याची अतर्क्य लीला व बाईसाहेबांचे त्या प्रसंगींचें लोकोत्तर धैर्य हीं समजून घेण्याकरितां तुह्मांस तें शेवटपर्यंत वाचणें भाग आहे. त्याबद्दल तुम्ही मनांत कितीही हळहळलां व चरित्रकारास दोष दिला, तरी ओघानें आलेला तो दुःखकारक प्रसंग त्यास तसाच टाकून पुढें जातां येत नाहीं. तर प्रियवाचहो, मागें रमाबाई सती जाण्याच्या वेळीं त्याप्रसंगाचें वर्णन तसेंच बाजूला ढकलून आम्हीं चरित्रभाग पुढें लिहावयास लागल्यामुळें तुमचा हिरमोड झालेला होता; तर आतां मन घट्ट करून तो सतीचा भयंकर देखावा बघण्यास तयार व्हा. त्यावेळीं तुम्हांस वचन देऊन आम्ही आपणांस बांधून घेतल्याप्रमाणें आतां तो दाखविण्यास प्रारंभ करितों.

अहल्याबाईसाहेब आपल्या पतीसह सुखांत असतां त्यांस दोन अपत्यें—एक पुत्र व एक कन्या—झालीं होतीं. पुढें त्यांस पतीचा वियोग झाल्यावर पुत्र मालिराव यास कांहीं काळ होळकरांच्या गादीचा उपभोग मिळून त्याच्या दुर्वर्तनानें अथवा बाईसाहेबांच्या दुर्दैवानें त्याचा कसा परिणाम झाला ही सर्व हकीकत यापूर्वीच वाचकांनीं वाचलेली आहे. आतां काय ती

त्यांच्या जीवाची त्यांची एकुलती एक कन्या मुक्ताबाई हीच होती, व ही महेश्वर येथील यशवंतराव पानसे या नांवाच्या एका जहागीरदाराच्या मुलास दिली होती हेंही मागें सांगण्यांत आलेंच आहे. लग्न झाल्यावर आपल्या पतीसह मुक्ताबाई आपल्या मातेप्रमाणेंच कडकडीत पातिव्रत्य राखून व तिच्या इतर सर्व सद्गुणांचें अनुकरण करून धर्माचरणांत काल घालवीत होती, व अपत्यस्नेहानें आपल्या आईस प्राप्त झालेल्या अनेक दुःखांचा निरंतर विसर पाडीत होती. परमेश्वराच्या कृपेनें कांहीं दिवसांनीं तिला पुत्रही झाला. मग तिला कसलें दुःख असावें बरें ? मनाजोगता पति, भरपूर ऐश्वर्य व पुत्रलाभ या तीन्ही गोष्टी लाभल्यामुळें, यांशिवाय आवश्यक अशी ऐहिक सुखाची गोष्ट कोणतीही नाही ह्मणून त्यांत सदा संतुष्ट राहून पतीच्या आज्ञेंत व परमेश्वराच्यासेवेंत ती आपलें आयुष्य कंठीत होती. तशांत अहल्याबाईसाहेबांचे बहुतेक स्वाभाविक गुण तिच्या अंगांत दिसून येत असल्यामुळें 'ही बाईसाहेबांस योग्य कन्या परमेश्वरानें दिली आहे' अशी लोकांत होत असलेली तिची कीर्ति तिला ऐकावयास मिळत असे. खुद्द बाईसाहेबही तिच्या गुणांची प्रशंसा करून त्या योगानें आपणास धन्य मानून घेत. याप्रमाणें मुक्ताबाई आपणास सर्व सुखें परमेश्वरानें दिली आहेत असें समजून सदोदित आनंदानें रहात असल्यास त्यांत नवल कसलें ? पण अरेरे ! अशा कुटुंबसुखांतही हें नष्ट दुर्दैव माती कालवून त्या कुटुंबांतील माणसांस हाय हाय करावयास लावण्यास एका पायावर तयार असतें ! देवाचें आणि दैवाचें हाड वैरच आहे कीं काय न कळे ह्मणून त्यानें दिलेलीं सुखें तें आपल्या प्रभावानें क्षणांत नाहींशी करून

टाकितें. दहाबारा वर्षें साध्वी मुक्ताबाई कोठें या सुखाचा आनंद घेते आहे तोंच तिच्या मुलाचा अंत झाला, त्यामुळें तिला किती दुःख झालें असेल हें सांगितलें पाहिजे काय ? तरी परमेश्वरसत्तेपुढें इलाज नाहीं ह्मणून व आपल्या मातेनें आणि पतीनें केलेल्या उपदेशास मान देऊन देवाच्या कृपेनें आणखीही मुलगा होईल अशा आशेवर तिनें त्या वेळचें आपलें औदासिन्य नाहींसें केलें व पुनः पतीसह ती आनंदानें राहूं लागली.

पण ज्या दुर्दैवास मुक्ताबाईच्या सुखाचा सर्वस्वीं अपहार करून तिच्या पातिव्रत्याची परीक्षा करावयाची होती व तिच्या धार्मिक मातेच्या दुःखाचा कडेलोट करून सोडावयाचा होता त्याची तिचा इतकाच छल करून तृप्तता झाली नाहीं. मुलगा गेल्याचें दुःख मुक्ताबाई कांहींसें विसरते आहे तोंच त्यानें निर्दय काळाग्नींत तिच्या प्रिय पतीची, अथवा मनोरथाचीच कां ह्मणाना, आहुति दिली! मग काय विचारितां आमच्या चरित्र नायिकेस तिच्या निर्मल पातिव्रत्याची परमेश्वरानें दिलेली केवळ मूर्तिमंत देणगीच अशा त्या मुक्ताबाईची शोकातिशयानें जी स्थिति झाली ती वाचून अंगावर रोमांच उभे राहतात. त्या वेळीं तिच्या दुःखास तर सीमा नव्हतीच; पण तिच्या प्रेमळ मातेची तो भयंकर प्रसंग ऐकून इतकी कठिण अवस्था झाली कीं ती धाडकन् जमीनीवर बेशुद्ध होऊन पडली. तसेच सर्व लोकही अत्यंत शोकाकुल झाले. मग मुक्ताबाई आपल्या शोकानें आकाशपाताळ एक करून जेथें बसली होती तेथें जाऊन व तिची ती हृदयद्रावक अवस्था पाहून ' हाय हाय ! मजप्रमाणेंच माझी

लाडकी मुक्ताबाई ही दुर्दैवी निघावीनां ? दुष्टा दुर्दैवा कसेंरे तुला हें आवडलें ?' असें ह्मणून कपाळ बडवून घेऊन ती रडूं लागली. बराच वेळपर्यंत तिला समजुतीच्या दोन गोष्टी सांगण्यास तिचें धैर्य झालें नाहीं. पतीविषयीं मोठमोठ्यानें आकांत करकरून मुक्ताबाईचें देहभान नाहींसें होऊन गेलें होतें. कंठ कोरडा पडल्यामुळें त्यांतून एकही शब्द निघत नव्हता; तरी आपली आई आलेली पाहतांच तिच्या गळ्याला मिठी मारून तिनें मोठ्यानें हंबरडा फोडिला. पण बराच वेळपर्यंत तिच्या मातेनें व इतर आप्तांनीं तिला दोन विचाराच्या गोष्टी सांगितल्या तेव्हां तिनें एकदम आपलें रडें गिळिलें व जवळच्या लोकांस 'माझी सती जाण्याची तयारी करा' असें ती ह्मणाली.

सती जाण्याविषयींचे आपल्या मुलीच्या मुखांतले शब्द ऐकतांच अहल्याबाईसाहेबांचें सर्व धैर्य सुटलें व त्यांना अनिवार दुःखानें घेरिलें. मग त्या मोठ्या प्रेमबुद्धीनें तिला आपल्या पोटाशीं धरून व जरासा दुःखाचा वेग आंवरून ह्मणाल्या, 'माझे लाडके, हा काय ग तूं आपला भलताच निश्चय करतेस ? या वेळीं असा अविचार करूं नकोस ? माझ्या जिवाला काय तो तुझाच विसावा असून हल्लीं मी ह्मातारी झालें असतां तूं आपलाच हेका धरून सहगमन करावें हें नीट नाहीं. जर तुझी माझ्यावर भक्ति असली तर या संसारांत मला एकटी निराश्रित सोडून तूं जाऊं नकोस. जाशील तर तुला देवाचीच शपथ आहे.'

बाईसाहेबांनीं असें ह्मटल्यावर मुक्ताबाई गहिवरून त्यांस ह्मणाली, 'आई, तुझें मजवर प्रेम आहे ह्मणून तूं ह्मणतेस

तें बरोबर आहे; पण तूंच विचार कर कीं, हल्लीं तुझें ह्मातारपण झालें आहे. आणखी थोडक्याच दिवसांत या तुझ्या धार्मिक आयुष्याची समाप्ति होईल. माझें आवडतें एकुलतें एक लेंकरूं तर यापूर्वींच यमाच्या घरीं गेलें आहे, आणि माझ्या सुखाचा सारा ठेवा जो माझा पति तो आज मला अंतरला. आतां तुझ्या ह्मणण्याप्रमाणें मी या जगांत राहिलें तर तुला चार दिवस सुख होईल व तुझी मर्जी न मोडल्यामुळें मलाही तोंपर्यंत समाधान वाटेल; पण पुढें तूंही जेव्हां मला सोडून जाशील तेव्हां दुःखानें हा जीव मला जड होईल व सौभाग्य बरोबर घेऊन जाण्याची जी आज अमूल्य संधि आली आहे ती पुढें कधीं येणार नाहीं. यासाठीं माझ्या सती जाण्याच्या निश्चयाच्या आड तूं येऊं नकोस.' आपल्या मुलीच्या तोंडांतून असे शांतपणाचे निघालेले उद्गार ऐकून बाईसाहेबांच्या मनाची स्थिति चमत्कारिक होऊन गेली. कोणाच्या धर्मकृत्यांत आड येऊन त्याच्यावर जुलूम करण्यास त्यांस परमेश्वराचें फार भय वाटत असल्यामुळें एकीकडे आपल्या मुलीस सती जाऊं नकोस असें सक्तीनें सांगणें त्यांस बरें वाटेनाव दुसरीकडे त्यांच्या अतिशय कन्यावात्सल्यामुळें विधि तिचा सहगमन आपल्या डोळ्यांनीं पाहण्यास त्यांस धैर्य होईना. अशा प्रकारच्या दोन्ही विचारांनीं त्यांचें मन गोंधळून गेलें आहे तोंच मुक्ताबाईनें सती जाण्याचाच आपला निश्चय कायम केला असें त्यांच्या दृष्टीस पडलें. तिनें मंगलस्नान करून सती जाण्याचीं वस्त्रें परिधान केलीं. आपल्या अंगावरचे सर्व अलंकार सुवासिनींना वांटले; व केंस मोकळे सोडून साऱ्या कपाळभर कुंकवाचा मळवट भरिला आणि गळ्यांत कापुराच्या माळा घातल्या. इतकी सर्व तयारी करून ती आप-

त्या मातेजवळ येऊन तिच्या पायां पडून व मोठ्या प्रेमानें तिच्या गळ्याला मिठी मारून तिजपाशीं सती जाण्याविषयीं निरोप मागूं लागली. तिचा त्या वेळचा तो भयंकर वेष पाहतांच बाईसाहेबांची कोणत्या प्रकारची अवस्था झाली ती आह्मांस शब्दांनीं सांगतां येत नाहीं. त्यांना आपली कन्या आपणास सोडून चालली याचें अत्यंत दुःख होऊन त्यांनीं मोठ्यानें किंकाळी फोडिली. मग आपल्या प्रिय कन्येच्या त्या वेळच्या त्या उग्र स्वरूपाकडे पाहून त्या निराशेनें ह्मणाल्या, 'मुक्ताबाई, शेवटीं तूं माझें ऐकत नाहींसच नां ? मला ह्मातारपणीं एकटीला दुःखांत टाकून तूं चाललीसचनां ?' यावर त्यांच्यानें कांहीं अधिक बोलवेना ! दुःखातिशयानें त्यांना घेरी आल्यासारखें होऊन त्यांनीं डोळे मिटले. आपल्या मातेची त्या वेळची ती दशा पाहून साध्वी मुक्ताबाईलाही तसेंच दुःख झालें, तरी आतां तें मनांत आणून कांहीं उपयोग नाहीं असा विचार करून ती तिला मोठ्या गंभीरपणानें ह्मणाली, 'आई, आतां तूं मला कोणताही उपदेश करूं नकोस, त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. या वेळीं माझें सर्व देहभान नाहींसें झालें आहे; व प्राणनाथाकडे जाण्याकरितां मन सारखें ओढ घेत आहे; तर आतां मजविषयींची सर्व माया सोड आणि मला निरोप दे. परमेश्वर तुझ्या या प्रेमास्तव तुझी माझी स्वर्गलोकीं खचित गांठ घालून देईल, व तेथें आपला कधीं वियोग होऊं देणार नाहीं. आई, तूं आजपर्यंत अनेक दुःखांच्या प्रसंगीं आपलें धैर्य खचूं दिलें नाहींस, तर या वेळीं तें सोडून माझ्या व आपल्या पुण्यकीर्तीस कमीपणा आणूं नकोस.' हें मुक्ताबाईचें निश्चयाचें भाषण ऐकून तिचा झालेला बेत फिरणें नाहीं अशी

बाईसाहेबांच्या मनाची पूर्ण खातरी होऊन चुकली. मग निरुपायास्तव आपल्या प्रियकन्येच्या देहावसानाचा तो शेवटचा भयंकर देखावा स्वतः डोळ्यांनीं पाहण्याचा त्यांनीं निश्चय केला. तरी जेव्हां त्यांच्या जावयाचें प्रेत वाड्यांतून बाहेर काढिलें व त्याबरोबर मुक्ताबाई शांतवृत्तीनें चालूं लागली तेव्हां त्यांच्या निश्चयाचा अंमल त्यांच्या देहावर चालेना. त्यांचे हातपाय अगदीं गळल्यासारखे होऊन त्यांस बसल्या जागेवरून उठवेना; तथापि दोघां ब्राह्मणांनीं दोहों बाजूनीं त्यांस धरिल्यावर त्या आपल्या कन्येमागून चालूं लागल्या. मग मोठ्या राजकीय समारंभानें तें प्रेत स्मशानांत आणिलें, व तयार केलेल्या चितागृहामध्यें त्याची स्थापना केली. नंतर सती मुक्ताबाईनें धर्मशास्त्रांत सांगितलेलीं त्या वेळचीं सर्व कृत्यें मोठ्या आनंदानें केलीं, आपल्या मैत्रिणींना सौभाग्यवायनें देऊन त्यांचा निरोप घेतला व ब्राह्मणांस नमस्कार करून त्यांचे आशीर्वाद मिळविले. चितागृहांत प्रवेश करण्याचे वेळीं तिनें आपल्या मातेची प्रेमानें शेवटची भेट घेऊन तिच्या चरणांवर मस्तक ठेविलें. बाईसाहेबांनींही त्या वेळीं सर्व दुःख एकीकडे ठेवून तिला आनंदानें आशीर्वाद दिला. नंतर मुक्ताबाईनें त्या चितागृहांत प्रवेश करून आपल्या पतीच्या शवास प्रेमालिंगन देऊन आपल्या हातानें त्या गृहास अग्नि लाविला. घटका लोटली नाहीं तोंच त्यांतून मोठमोठ्या भयंकर ज्वाला निघून त्या प्रेमबद्ध व धार्मिक तरुण दंपत्याच्या देहांची त्यांनीं रक्षा करून टाकिली!

मुक्ताबाईस आशीर्वाद देते वेळीं व ती चितागृहांत शिरली त्यावेळीं

बाईसाहेबांनीं मोठें धैर्य धरिलें होतें खरें; पण जेव्हां त्या गृहांतून अग्नीच्या भयंकर ज्वाला निघालेल्या दृष्टीस पडल्या तेव्हां त्यांची सर्व शुद्धि पुनः नष्ट झाली व आपल्या प्रिय कन्येला ' मुक्ताबाई, तूं कोठें आहेस, मला एकवार तरी भेटकीं ग ' अशा वारंवार हांका मारून त्या मोठ्यानें विलाप करूं लागल्या व तें पाहून इतर लोकांच्या नेत्रांवाटेंही एकसारख्या दुःखाश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. या वेळीं बाईसाहेबांच्या ठायीं इतकें कांहीं कन्यावात्सल्य उत्पन्न झालें होतें कीं, आपल्या लाडक्या मुलीचा वियोग आतां आपणास सहन होणें नाहीं, ह्मणून तिच्यामागून आपणही त्या अग्निकुंडांत आपल्या देहाची आहुति द्यावी असा त्यांच्या मनांत विचार येऊन त्या चितागृहाकडे धावूं लागल्या; पण जवळच्या दोनचार ब्राह्मणांनीं त्यांना घट्ट धरून जागच्याजागीं मोठ्या प्रयासानें थांबविलें; तरी त्या त्यांच्या हातांतून सुटण्याचा प्रयत्न करीत होत्या आणि वेड्यासारख्या होऊन आपल्या अंगास मोठमोठ्यानें आळेपिळे देत होत्या, व आपणास धरणाऱ्या ब्राह्मणांना प्रथम अधिकारानें व नंतर प्रार्थनेनें सोडण्याविषयीं सांगत होत्या. पण ते स्वामिनिष्ठ ब्राह्मण त्यांस सोडून तसें कसें करूं देणार ? एकटी आपली मुक्ताबाईच आपणास आई ह्मणणारी नसून सर्व लोकही आपणास मातेप्रमाणें मानितात हें त्या वेळीं जरी त्या विसरून गेल्या होत्या तरी कोणालाही त्याचा विसर पडला नाहीं आणि खचितच या वेळीं त्यांस लोकांनीं आवरून धरिलें ह्मणून आणखी कांहीं दिवस त्या या जगांत राहिल्या; नाहीं तर त्या वेळीं त्या प्रेमातिशायानें इतक्या बेफाम होऊन गेल्या होत्या कीं, मुक्ताबाईच्या मागून त्या जळत्या चितेंत त्यांनीं आपल्या प्रा-

णाची हानि करून घेतली असती. असो. इकडे असा प्रकार चालला आहे तों तिकडे चितागृहाची पार रक्षा होऊन गेली व ती बाईसाहेबांनीं पाहतांच त्यांचें सर्व वेड एकदम नाहींसें होऊन त्या इतक्या शुद्धीवर आल्या कीं, आतां मला काय करावयाचें तें सांगा असें ब्राह्मणांस ह्मणाल्या. नंतर ब्राह्मणांनीं सांगितल्याप्रमाणें नर्मदा नदींत उतरून त्यांनीं स्नान केलें व शास्त्रांत सांगितलेलीं त्यानंतरचीं और्ध्वदेहिक कृत्यें, जीं त्यांनीं करावयास सांगितलीं तीं सर्व त्यांनीं मोठ्या आस्थेनें केलीं; व तो सर्व विधि आटोपल्यावर, त्या जरी मनांत अतिशय उदासीन झाल्या होत्या तरी वरकांतीं मोठा गंभीरपणा धारण करून आपल्या लोकांबरोबर घरीं आल्या. घरांत पाय ठेवतांच एकाएकीं त्यांच्या हृदयांत भडभडून आलें. व त्या एकांत स्थलीं जाऊन बसल्या. तेथें तीन दिवसपर्यंत त्या तशाच शोकाकुल स्थितींत राहिल्या. त्या तीन दिवसांत त्यांनीं कांहीं देखील खाल्लें नाहीं व झोंपही घेतली नाहीं.

त्या नंतर आपल्या निस्सीम प्रेमास्तव ज्या ठिकाणीं मुक्ताबाईनें आपला देह अग्नीस अर्पण करून आपलें कडकडीत पातिव्रत्य जगास दाखविलें त्या ठिकाणीं बाईसाहेबांनीं पुष्कळ द्रव्य खर्च करून अतिशय सुंदर असें एक देऊळ तिच्या नांवानें बांधिलें. हें त्यांनीं केलेलें कन्येचें स्मारक अद्यापि कायम असून तें इतकें उत्तम आहे कीं त्याच्या तोडीचें देऊळ सर्व हिंदुस्थानांत क्वचितच कोठें आढळेल.

साध्वी मुक्ताबाईचा अशा रीतीनें झालेला अंत हें बाईसाहेबांचें शेवटचें दुःख होय. यापुढें आणखी दुःखाचे प्रसंग

पाहण्यास त्या फार दिवस या जगांत राहिल्याच नाहींत. पण त्यांच्या वृद्धापकाळीं या दुःखाचा त्यांच्या हृदयांत जो विलक्षण धक्का बसला तो आमरण कायम होता. यानंतर त्यांच्या मुखावर आनंद ह्मणून कधीं दृष्टीस पडलाच नाहीं, व कोणतेंही ऐहिक कृत्य करण्यांस त्यांस उत्साह वाटला नाहीं. ह्मातारपणीं त्या दुःसह दुःखानें त्यांची अशी स्थीति झाली हें योग्यच आहे; पण त्यांनीं केवळ मातेप्रमाणें आपल्या प्रजेचें न्यायानें व प्रेमानें पालन करून अपरिमित औदार्य दाखविलें असतां व अनेक ठिकांणीं चिरकालिक सत्कृत्यें करून महत्पुण्य संपादन केलें असतां शेवटीं त्यांचा असा दुष्परिणाम झाला हें पाहून ऐहिक धर्मकृत्यांविषयीं बेपर्वाई व परमेश्वराविषयीं नास्तिकबुद्धि आपल्या मनांत उत्पन्न होण्याचा संभव आहे खरा, पण विचार करून पाहतां असें होणें हें केवळ भ्रांतिमूलक होय. परमेश्वरसत्तेनें या जगांत ज्या कांहीं गोष्टी घडून येतात त्यांपासून लोकांस उत्तम शिक्षण प्राप्त व्हावें असा त्याचा हेतु असतो, तसाच आमच्या चरित्रनायिकेवर आलेल्या या प्रसंगाचाही असला पाहिजे. आतां तो अमुकच असेल हें जरी निश्चयानें सांगतां येत नाहीं, तरी या आपल्या अज्ञानास्तव त्या जगन्नियंत्याविषयींचा आपला पूज्यभाव कमी होऊं देणें हें आपणास अगदीं अनुचित होय.

**भाग चौदावा समाप्त.**

---

# भाग १५ वा

## अंतकाल आणि उपसंहार.

आपली प्रिय कन्या सौभाग्यवती मुक्ताबाई इचा चिरकालिक वियोग झाल्यावर कोणत्याही ऐहिक गोष्टीपासून आपणास समाधान होणें नाहीं असा बाईसाहेबांचा निश्चय होऊन केवळ परलोकप्राप्तीचींच धर्मशास्त्रांत सांगितलेलीं कृत्यें त्या आचरूं लागल्या, व या उप्पर आपल्या हातून राज्यकारभाराचें काम होणार नाहीं अशा आशयाचें पत्र त्यांनीं तुकोजीरावांस पुण्यास पाठवून त्यांस तें करण्याविषयीं ताबडतोब इंदुरास निघून यावें असें लिहिलें. आपल्या उपकारकर्त्रीवर मातेप्रमाणें पूज्यभाव ठेवून सदैव तिच्या आज्ञा पाळणारा तुकोजीराव हें पत्र पाहतांच इंदुरास यावयाचा; पण त्या वेळीं श्रीमंतांचा निजामावर स्वारी करण्याचा विचार ठरला असून त्या महत्वाच्या कार्यांतील प्रमुखत्वाचा बराच भाग त्यांनीं त्याच्यावर सोंपविलेला असल्यामुळें निरुपायास्तव त्यास तेथें राहणें भाग पडलें. बाईसाहेबांसही ही त्याची अडचण कळल्यावर त्याच्या न येण्याचा राग न येतां त्यांनीं तो येई तोंपर्यंत राज्याची सर्व व्यवस्था आपल्या विश्वासुक दिवाणाकडेस सोंपविली, व संकल्प केल्याप्रमाणें सर्व ऐहिक व्यवहारापासून त्या अलिप्त राहिल्या. त्यांच्या वयास या वेळीं साठ वर्षे परिपूर्ण झालीं होतीं व अनेक प्रकारच्या शारिर श्रमांनीं व मानासिक

दुःखांनीं त्यांची सर्व शक्ति क्षीण झाली होती. तेव्हां आतां आपणास परलोकास जाण्याची तयारी केलीच पाहिजे असें त्यांस खचित वाटलें असावें असें आह्मांस वाटतें. तेव्हांपासून त्या नित्य उपोषण करीत व त्रिकाळ स्नान करून पार्थिवपूजा करीत. तसेंच विशेष महत्वाच्या कारणावांचून कोणाची भेट वगैरे न घेतां एकांतांत बसून हातीं जपमाला घेऊन रामनामाचा जप करीत. दुपारीं व सायंकाळीं पुराण श्रवण करून देवदर्शन घेत व सदा आनंदित वृत्ति ठेवून एकाद्या विरक्त साधूप्रमाणें कालक्रमण करीत. कोणाशीं कांहीं बोलावयाचें झालें तर ऐहिक व्यवहारसंबंधानें मुळींच भाषण न करितां परमार्थपर भाषण करीत.

बाईसाहेबांचें औदार्य तर या वेळीं परमावधीस जाऊन पोंचलें होतें. त्या जातीनें जरी नित्य उपोषण करून रहात होत्या. तरी नित्य हजारों ब्राह्मणांस पंचपक्वान्नांचें भोजन व दक्षिणा देऊन तृप्त करीत असत, व शेंकडों दंपत्यांस मूल्यवान् वस्त्रें व अलंकार अर्पून संतुष्ट करीत असत. ब्राह्मणाप्रमाणेंच इतर सर्व जातींच्या लोकांसही त्यांच्या येथें मुक्तद्वार असल्यामुळें एकाद्या क्षेत्राच्या ठिकाणीं जशी यात्रा भरावी तशी महेश्वरास ठिकठिकाणचे लोक येऊन त्यांची गर्दी होऊन राहिली होती. तशांत आणखी बाईसाहेबांनीं सर्व ऐहिक व्यवहार सोडिले ह्मणून त्यांच्या समाचाराकरितां त्यांच्या पदरचे व त्यांच्याशीं सलोख्यानें वागणारे इतर राजे जे आपल्या परिवारानिशीं महेश्वरीं त्यांस भेटावयास येत असत त्यांचे ठिकठिकाणीं तळ पडून त्या योगानें त्या शहरास विलक्षण शोभा आली होती. बाईसाहे-

बांच्या मनांतील हेतु सर्व जनसंपर्क सोडून आपण केवळ ईश्वरार्चनांत काळ घालवावा असा असल्यामुळें त्यांनीं आपल्या धर्मकृत्यांची व्यवस्था ब्राह्मणांच्या गळ्यांत घालून त्या विरक्त होत्सात्या एकांतांत बसल्या होत्या, पण ज्या सर्व लोकांचा त्यांचे ठायीं ईश्वराप्रमाणें भाव होऊन राहिला होता ते त्यांस कसें चैन पडूं देणार ? बाईसाहेबांचें दर्शन करून देण्याविषयीं ते त्यांच्या जवळ असणाऱ्या सेवकजनांचा सारखा पिच्छा पुरवीत; तेव्हां निरुपायास्तव दिवसांतून एक वेळ बाहेर येऊन आपल्या दर्शनानें सर्वांस संतोषित करणें त्यांस भाग पडे. ही लोकांची इच्छा जशी बाईसाहेबांनीं तृप्त केली त्याप्रमाणेंच त्यांच्या भेटीकारितां जे राजेरजवाडे येत त्यांची भेट न घेतली तर त्यांचा आपण अपमान केल्यासारखा होऊन त्यांस दुःख होईल असा विचार करून त्या त्यांचीही भेट घेऊन घटकाभर त्यांच्याशीं संभाषण करीत व ते तेथें असत तोंपर्यंत त्यांचा मानमरातब आपले लोक कसा ठेवितात याची चौकशी करीत.

अहल्याबाईसाहेबांचा हा नित्य क्रम सुमारें चार महिने पर्यंत सुरळीतपणें चालला. पुढें त्यांच्या अंगांतली सर्व शक्ति नष्ट होऊन त्यांच्या इंद्रियांवर त्यांचा अंमल चालेनासा झाला. आणि असें झालें यांत नवल तरी कसलें ? बाईसाहेब किती जरी पुण्यशील असल्या तरी त्यांचें शरीर मानवीच होतें, तेव्हां अशा पंचभौतिक देहावर दुःखाचे अनेक आघात झाले तर त्यांच्यापुढें त्याचा किती दिवस टिकाव लागणार ? तशांतन राज्यकारभारासारख्या अतिशय दगदगीच्या कामांत त्यांच्या आयुष्याचा बराच भाग गेला असल्यामुळें व अनेक व्रतवैकल्यें व

उपासतापास त्या करीत असल्यामुळें त्याची शक्ति अत्यंत क्षीण झाली होती. दुसरा कोणी असतां तर खरोखरच अशास्थितींत तो अगदीं अंथरूण धरून राहता व आपल्या परिजनांवर संतापून ईश्वराच्या नांवानें हांका मारता; पण धन्य त्या साध्वीची! अशा वेळींही तीनें आपल्या मनाची चलबिचल होऊं न देतां परमेश्वराकडे लय लावून त्याच्या नामस्मरणांत आपले अंतकाळचे दिवस घालविले. तिच्या जबर पुण्याईमुळें अशा परतंत्रस्थितींत तिला एक आठवड्यापेक्षां अधिक काळ कंठावा लागला नाहीं. शेवटीं सन १७९५ ह्मणजे शके १७१७ यावर्षी श्रावण वद्य चतुर्दशीस सावधान मनानें प्रभूचें नामस्मरण करीत असतां या आमच्या पुण्यशील चारित्र नायकेच्या धार्मिक आयुष्याची समाप्ति झाली. त्याच दिवशीं प्रातःकाळीं तिच्या परमप्रीतींतली एक धेनु होती तिनें मोठ्यानें हंबरडा फोडून प्राण सोडिला. अंतकाळीं देखील या साध्वीनें बारा हजार ब्राह्मणांस भोजन घालण्याचा संकल्प करून आपली उदारबुद्धि जागृत ठेविली होती.

अहल्याबाईसाहेबांचें देहावसान झालें तेव्हां तुकोजी होळकर त्यांच्या जवळ नव्हता ह्मणून त्याचा धाकटा भाऊ संताजी होळकर यानें मोठ्या समारंभानें त्यांचें उत्तरकार्य केलें. त्यांचें प्रेत स्मशानांत नेते वेळीं त्यांच्या ठिकाणीं मातेप्रमाणें प्रेम ठेवणारे त्यांचे लक्षावधि प्रजाजन त्यांस समारंभानें पोंचविण्यास गेले होते. त्यांच्या प्रेतास अग्निसंकार करतेवेळीं त्या सर्वांनीं त्यांच्या मंगल नामाचा मोठ्यानें गजर केला व ‘ अहल्याबाईसाहेबांस त्यांच्या पुण्यकर्माबद्दल निरंतर आपल्या चरणापाशीं ठेव ’ अशी करुणस्वरानें परमेश्वराची प्रार्थना केली.

बाईसाहेबांच्या मरणानें ज्यांस दुःख झालें नाहीं असा त्यावेळीं साऱ्या हिंदुस्थानांत एकदेखील प्राणी नव्हता. त्यांचे आवडते प्रजाजन, त्यांचे यजमान श्रीमंत पेशवे व त्यांच्याशीं स्नेहभावानें वागणारे सर्व राजेरजवाडे यांस त्यांच्या वियोगानें जें अपरिमित दुःख झालें त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. आह्मी एवढेंच ह्मणतों कीं, त्या वेळीं आह्माला सोडून बाईसाहेब गेल्या नाहींत; तर भूतदया, पातिव्रत्य, प्रजावात्सल्य, इत्यादि सद्गुणांची देवताच या आमच्या हतभाग्य लोकांतून नाहींशी झाली! पण त्याबद्दल शोक करून व कपाळावर हात मारून आपण किती वेळ जरी कष्टी होऊन बसलों तरी त्याचा काय उपयोग होणार? या मृत्युलोकचा जो प्राणी एकदा गेला तो परत येत नाहीं. परमेश्वराच्या कृपेनें व आपल्या भाग्यानें जितका त्याचा लाभ आपणास घडला तितक्यांतच समाधान मानून पुढें त्याच्या कृपेनें तसा प्राणी कधीं उत्पन्न होतो याकडे डोळे लावून बसावें हेंच आपणास योग्य आहे. मानवी आयुष्याचा विचार केला तरी, बाईसाहेबांचा जो त्यांच्या साठाव्या वर्षीं काल झाला तो जरी अगदीं अकालीं नव्हता तरी योग्यकालीं झाला असेंही ह्मणतां येत नाहीं. अशा उदारशील साध्वीस परमेश्वरानें आणखी वीसपंचवीस वर्षें या जगांत ठेविलें असतें तरी कांहीं सृष्टिनियमा विरुद्ध झालें असतें असें नाहीं. पण या निरर्थक विचाराचा आतां काय उपयोग? एकपक्षीं बाईसाहेबांसारख्या पुण्यशील स्त्रीस आयुष्याचीं साठ वर्षें मिळालीं ही तरी परमेश्वरानें मोठीच कृपा केली असें ह्मणावें लागतें. कारण या आर्यभूमीवर पहिल्यापासूनच त्याची इतकी अवकृपा होऊन राहिली आहे

कीं, तिच्या पोटीं जीं कांहीं चांगलीं माणसें निपजतात
इतकेंही आयुष्य क्वचितच कोणाच्या वांट्यास येतें.

प्रियवाचकहो, आमच्या अहल्याबाईसाहेबांचें चरि
संपलें. त्यांच्या पश्चात् होळकरांच्या राज्याची व्यव
शी झाली ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे; ते
येथें देऊन उगीच जागा न अडवतां त्यांच्या या च
सून आपणास घेण्यासारख्या ज्या कांहीं गोष्टी आहेत
दोन शब्द लिहितों.

आपल्या प्राचीन पुराणग्रंथांत अहल्या, द्रौपदी, सीत
यंती, सावित्री, तारामती वगैरे ज्या साध्वी व उदार स्त्रिय
रित्रें व्यासासारख्या महर्षींनीं लिहिलीं आहेत त्या स्त्रियां
णांत आणि बाईसाहेबांच्या गुणांत किंचित्ही अंतर
ह्मणून आमच्यांतील कुलस्त्रियांस कित्ता घेण्यासारखें हें चरि
ठेवून त्यांस त्यांच्या ठायीं असलेल्या प्रत्येक गुणाचें अ
करावयास लावणें हें आपलें कर्तव्य कर्म आहे असें
वाटतें. जन्मापासून अंतकालपर्यंत त्यांच्यावर कोणकोणते
प्रसंग आले व अंगच्या लोकोत्तर धैर्यानें ते त्यांनीं कसें
केलें याचें उदाहरण जर आपल्या स्त्रियांच्या नित्य
समोर राहील तर त्यापासून चांगलें शिक्षण मिळून
संसारयात्रा त्यांस सुखावह होईल. आतां त्यां
जसे एकामागून एक अनेक दुःखाचे प्रसंग आले तसे अ
स्त्रियांवर येतीलच असें नाहीं व तसे येऊं नयेत अशी अ
इच्छा आहे; पण न जाणों, हा मृत्युलोक आहे; ये

